






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






कै. पुरुषोत्तम शिवराम रेगे



जन्म : २-८-१९१० मृत्यू : १७-२-१९७८

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादक

डॉ. हेमंत विष्णु इनामदार

संपादन समिती

डॉ. प्रभाकर लक्ष्मण गावडे
डॉ. वसंत सखाराम जोशी
डॉ. अशोक प्रभाकर कामत
डॉ. निर्मलकुमार जिनदास फडकुले
प्रा. मधुकर शंकर वाबगावकर
डॉ. युसुफखान महंमदखान पठाण

आश्विन-कार्तिक
मार्गशीर्ष, शके १८९९
ऑक्टोबर-नोव्हेंबर-
डिसेंबर इ. स. १९७७
प्रसिद्धि दिनांक
जानेवारी २२, १९७८
अंक क्रमांक २०३,

मूल्य पाच रुपये.

मुद्रक

श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

प्रकाशक

श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद, पुणे ३०








# अनुक्रमणिका

# संपादकीय

## १. डिसेंबरचा अंक जानेवारीत

परिषदेचे हे त्रैमासिक मुखपत्र वेळच्या वेळी प्रसिद्ध व्हावे, असा आरंभापासूनचा आमचा प्रयत्न आहे. पण या खेपेस ते जमले नाही. डिसेंबर १९७७ मध्ये प्रकाशित व्हावयाच्या प्रस्तुत अंकास तीन आठवड्यांनी उशीर झाला आहे. प्रासंगिक पण महत्त्वाच्या अशा घटनांचा परामर्श घेणारे लेख आवर्जून मागवावे, मुदत टळून गेल्यावर नकार हाती यावा, त्यामुळे त्या विषयांची पुन्हा अन्य योजना आखावी व ते पर्यायी लेखन हाती आल्यावर त्याची मुद्रण-प्रत करावी, या खटाटोपात काळ-काम-वेगाचे गणित कधीमधी चुकते. तरीपण झालेल्या विलंबाबद्दल आम्ही अतिशय दिलगीर आहो.

## २. साहित्य संमेलने

( अ ) मराठी साहित्य महामंडळाचे अखिल भारतीय **मराठी साहित्य संमेलन** ( बावन्नावे अधिवेशन ) पुण्यास १८, १९ व २० नोव्हेंबर १९७७ रोजी साजरे झाले. पुणे नगर वाचन मंदिराच्या विद्यमाने हे संमेलन भरले होते; आणि ( महामंडळाची एक घटक संस्था या नात्याने–) महाराष्ट्र साहित्य परिषदेने सर्व प्रकारचे सहकार्य त्यासाठी दिले होते. कर्वे पथावरील गरवारे महाविद्यालयाच्या प्रांगणात उभारलेल्या ' महात्म फुले–नगरा 'त संमेलनाचा समारोह श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे यांच्या अध्यक्षतेखाली भव्य स्वरूपात पार पडला. नामदार सौ. शशिकला काकोडकर या संमेलनाच्या उदघाटक होत्या; आणि कविवर्य श्री. ग. ल. ठोकळ यांनी स्वागताध्यक्ष म्हणून धुरा सांभाळली. श्री. पु. ए. कड्रकर, श्री. शरच्चंद्र तपस्वी, श्री. व. गं. साळवी, श्री. अ. शि. गणपुले प्रभृती पुणे नगर वाचन मंदिराच्या पदाधिकाऱ्यांनी संमेलनाच्या सिद्धीसाठी भरपूर परिश्रम घेतले.

' पुण्याई ' या इनामदार–कुलकर्णी संपादित स्मरणिकेचे प्रकाशन, कोशकार–सूचिकारांचा सत्कार, दोन समीक्षात्मक परिसंवाद, एक कविसंमेलन, आणि हिंदी, तमिळ, गुजराती, बंगाली व सिंधी या भाषाभगिनींची परिचयमाला ही या संमेलनाची वाङ्मयीय फलश्रुती होय.

( आ ) मराठीतील ख्यातनाम **ग्रामीण लेखकांचा मेळावा** पुण्यास भारती विद्यापीठाच्या वास्तूत दि. २१ व २२ नोव्हेंबर १९७७ रोजी भरला होता. सर्वश्री प्रभाकर

अनुक्रमणिका

पाध्ये, म. द. हातकणंगलेकर, गो. म. कुलकर्णी, द. मा. मिरासदार, शंकर पाटील, देवदत्त दाभोळकर प्रभृती साहित्यिकांनी ग्रामीण साहित्याच्या प्रगतीच्या दिशा आपापल्या भाषणांतून विशद केल्या.

( इ ) दि. २५ डिसेंबर १९७७ रोजी कुलाबा जिल्ह्यातील महाड येथे श्री. भाऊसाहेब अडसूळ यांच्या अध्यक्षतेखाली **बौद्ध साहित्य संमेलन** साजरे झाले.

( ई ) सोलापूर येथे अकरावे **ख्रिस्ती मराठी साहित्य संमेलन** दि. २७, २८ व २९ डिसेंबर १९७७ रोजी भरविण्यात आले. श्री. रॉक कार्व्हालो हे या संमेलनाचे अध्यक्ष होते.

( उ ) ' महाराष्ट्र दलित साहित्य संसदे'च्या विद्यमाने दुसरे **दलित साहित्य संमेलन** १४ व १५ जानेवारी १९७८ रोजी ' कवी केशवसुत नगर, सिद्धार्थ विहार, वडाळा बस डेपोसमोर, मुंबई–३१ ' येथे भरले होते. प्रा. गं. बा. सरदार हे समाजमनस्क विचारवंत व ख्यातनाम साहित्यिक हे या संमेलनाचे अध्यक्ष होते. नामदार दादासाहेब रूपवते यांनी संमेलनाचे उद्‌घाटन केले. दलित साहित्य व दलित रंगभूमी यांविषयींचे परिसंवाद, दलित कविता व दलित चळवळी यांविषयीचे निबंधवाचन, दलित साहित्याची समीक्षा करणाऱ्या, श्री. अर्जुन डांगरे, प्रा. यशवंत मनोहर व डॉ. भालचंद्र फडके यांच्या ग्रंथांचे प्रकाशन, कविसंमेलन इत्यादी भरगच्च कार्यक्रमांनी व प्रा. सरदारांच्या विचारपरिप्लुत भाषणाने हे संमेलन सफल–संपूर्ण झाले. सर्वश्री म. ना. वानखेडे, बाबूराव बागुल, मधुकर तुपलोंढे, दया पवार, अर्जुन डांगळे, प्रल्हाद चेंदवणकर, रावसाहेब कसबे प्रभृती कार्यकर्त्यांच्या परिश्रमांचा व योजकतेचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे.

( ऊ ) श्री. लक्ष्मणराव सरदेसाई यांच्या अध्यक्षतेखाली पंधरावे **गोमंतक मराठी साहित्य संमेलन** जानेवारी १९७८ मध्ये साजरे झाले.

—मराठीच्या प्रगतीविषयीच्या आपणा सर्वांच्या जाणिवा व्यापक होण्याच्या दृष्टीने ही सर्व साहित्य संमेलने निश्चितच उपकारक ठरतील.

### ३. मराठीचा पुरस्कार

( अ ) **मराठी भाषा अन्याय निर्मूलन परिषद** मुंबईतील कीर्ति महाविद्यालयामध्ये दि. १६ ऑक्टोबर १९७७ रोजी भरली होती. सर्वश्री धों. वि. देशपांडे, स. गं. मालशे, माधव गडकरी, गंगाधर गाडगीळ, वा. ल. कुलकर्णी, वसंत बापट, मंगेश पाडगावकर, वि. वा. शिरवाडकर, द. न. गोखले, मे. पु. रेगे, मो. शं. हुजुरबाजार, पु. ज. देवरस, प्रभुराम जोशी, वसंत दावतर, स. शि. भावे, पु. भा. भावे प्रभृती विचारवंतांनी मराठीवरील विविधांगी अन्यायांचे स्वरूप व त्यावरील उपाययोजना यांविषयी विवेचन केले.

( आ ) महाराष्ट्र राज्य **माध्यमिक प्रशाला मुख्याध्यापक संघाचे** अठरावे अधिवेशन कोल्हापूर येथे दि. ६ ते ८ नोव्हेंबर १९७७ रोजी भरले होते. 'उच्च माध्यमिक शाळांतून प्रवेश मिळण्यासाठी इंग्रजी सक्तीचे नसावे,' असा ठराव तेथे संमत करण्यात आला.

( इ ) मुंबईतील पोदार महाविद्यालयात दि. २७ नोव्हेंबरला भरलेल्या **मराठी अर्थ-शास्त्र परिषदेत** डॉ. नी. वि. सोवनी यांचे अध्यक्षीय भाषण झाले. '**मराठीत अर्थ-शास्त्रीय लेखन झाले पाहिजे**' असे त्यांनी आग्रहाने मांडले.

( ई ) दि. २७ नोव्हेंबरलाच सातवे **मराठी विज्ञान संमेलन** झाले. महाराष्ट्रातील सर्व शैक्षणिक अभ्यासक्रम मराठी माध्यमातून शिकवण्याच्या योजनेस अग्रक्रम द्यावा, असा ठराव खुल्या अधिवेशनात संमत करण्यात आला.

**४. वाङ्मयीन उपक्रम**

( अ ) मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयातर्फे प्रसिद्ध व्हावयाच्या '**मराठी नियत-कालिकांची सूची : इ. स. १८०० ते १९५० : खंड दुसरा, भाग पाचवा**' या ग्रंथाचा मुद्रणप्रारंभ पुण्यास म. सा. परिषदेच्या सभागृहात २१ ऑक्टोबर १९७७ रोजी करण्यात आला. १ ऑगस्ट १९७८ रोजी प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित होणार असून त्यानंतर इ. स. १९५१ ते १९७५ या कालखंडाची पुरवणीसुद्धा प्रसिद्ध करण्याचा मंडळाचा इरादा आहे.

( आ ) अहमदनगर येथील **ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयातील** म. म. दत्तो वामन पोतदार विभागाचे उद्घाटन दै. 'सकाळ'चे संपादक श्री. श्री. ग. मुणगेकर यांच्या हस्ते दि. १२ डिसेंबर १९७७ रोजी झाले. इ. स. १८०१ ते १९०० या शतकात प्रसिद्ध झालेल्या दुर्मिळ मराठी पुस्तकांचा संग्रह या विभागात करण्यात आला आहे.

( इ ) औदुंबर येथील '**सदानंद साहित्यसंमेलनाचे** अध्यक्षपद प्रा. द. मा. मिरासदार यांनी यंदा भूषविले.

( ई ) '**गदिमा प्रतिष्ठाना**' विषयीचे श्री. राजा मंगळवेढेकरांचे आवाहन दि. २८ डिसेंबर १९७७ रोजी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले.

( उ ) पुणे विद्यापीठ **टागोर व्याख्यानमालेतर्फे** श्रीमती दुर्गा भागवत यांची 'सत्यं, शिवं, सुंदरम्' या विषयावरील तीन व्याख्याने पुण्यास ५, ६ व ७ जानेवारी १९७७ रोजी झाली.

( ऊ ) साहित्य अकादमीतर्फे पुण्यास दि. १४ ते १९ जानेवारी १९७७ रोजी, मराठी, गुजराती, सिंधी व कोकणी भाषिक **एकांकिका लेखकांचे शिबिर** भरविण्यात आले.

## ७. सांस्कृतिक उपक्रम

( अ ) जिल्हा **पत्रकार संघाचा अभ्यासवर्ग** धुळयास श्री. रंगा वैद्यांचा अध्यक्षतेखाली दि. १ ऑक्टोबर १९७७ रोजी भरला होता.

( आ ) **साने गुरुजी कथामालेचे** रौप्य महोत्सवी अधिवेशन दादरला १ ते ६ नोव्हेंबर १९७७ रोजी भरविण्यात आले. सर्वश्री अच्युतराव पटवर्धन, बाबा आमटे, ब. मो. पुरंदरे, राजा मंगळवेढेकर, कुसुमाग्रज, राम जोशी, व. पु. काळे प्रभृती साहित्यिक व कार्यकर्ते या समारोहात सहभागी झाले होते.

( इ ) **सवाई गंधर्व पुण्यतिथीचा** पंचविसावा संगीत महोत्सव २ ते ५ नोव्हेंबर १९७७ रोजी पुण्यास साजरा झाला.

( ई ) **जागतिक रंगभूमिदिन** महाराष्ट्रात काही ठिकाणी नोव्हेंबर १९ ७ मध्ये साजरा झाला.

( उ ) बाल साहित्यालयाच्या वतीने पुण्यास **बाल चित्रपट महोत्सव** १४ ते १७ नोव्हेंबर रोजी साजरा झाला. तसेच कोल्हापूरला भरलेल्या **बाल आनंद मेळाव्यात** चित्रकला, गायन, वादन, नाट्य, वाचनालय, लेखन इत्यादी दालनांतून बालकांच्या ललित कलांचे नमुने मांडण्यात आले होते.

( ऊ ) **ग्रंथालय जागृति सप्ताह** १४ ते २० नोव्हेंबर रोजी महाराष्ट्रभर पाळण्यात आला.

( ए ) शिवशाहीर श्री. ब. मो. पुरंदरे यांची **शिवचरित्र व्याख्यानमाला** ९ ते २३ डिसेंबर रोजी पुण्यास घेण्यात आली. श्रोत्यांचा प्रतिसाद केवळ अपूर्व होता. पुण्यातील ‘ अक्षय्य सेवा प्रतिष्ठाना ’ने ही व्याख्यानमाला आयोजित केली-

( ऐ ) अठ्ठावन्नावे **मराठी नाट्यसंमेलन** २६, २७ व २८ डिसेंबर १९७७ रोजी श्री. पुरुषोत्तम दारव्हेकर यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यास साजरे झाले. उद्योगपती श्री. शंतनुराव किर्लोस्कर हे संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. सर्वश्री. दाजी भाटवडेकर, अरविंद देशपांडे, प्रकाश इनामदार, दामू केंकरे प्रभृतींनी आपले विचार चर्चेतून व परिसंवादांतून व्यक्त केले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी संपादिलेली नाट्यसंमेलन स्मरणिका या वेळी प्रसिद्ध करण्यात आली.

( ओ ) **गुजराती साहित्यपरिषदेच्या** स्वतःच्या नव्या वास्तूचा पायाभरणी समारंभ अहमदाबाद येथे साबरमती नदीतीरी दि. २९ नोव्हेंबर रोजी श्रीमती दुर्गा भागवतांच्या हस्ते पार पडला. गुजराती कवी उमाशंकर जोशी हे अध्यक्षस्थानी होते.

## ८. अभीष्टचिंतन

( अ ) डिसेंबर १९७७ मध्ये ‘ **बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी** ’ या ख्रिस्ती प्रकाशनसंस्थेस दीडशे वर्षे पूर्ण झाली.

( आ ) पुण्यातील सर परशुरामभाऊ महाविद्यालयाचा हीरक महोत्सव पंतप्रधान श्री. मोरारजीभाई देसाई यांच्या अध्यक्षतेखाली २७ डिसेंबर १९७७ रोजी साजरा झाला.

( इ ) प्रसिद्ध प्रकाशक आणि ' विश्रब्ध शारदा 'कार श्री. ह. वि. मोटे यांच्या वयास २ ऑक्टोबर १९७७ रोजी सत्तर वर्षे पूर्ण झाली.

( ई ) म. सा. परिषदेचे उपाध्यक्ष, सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयातील मराठी विभागाचे प्रमुख, प्रथितयश कवी, समीक्षक आणि संशोधक डॉ. वि. म. कुलकर्णी यांनी दि. ७ ऑक्टोबर १९७७ रोजी एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केले.

## ७. थोरांचे पुण्यस्मरण

( अ ) महात्मा जोतिबा फुले या समाजोन्मुख विचारवंतांचे व दलितोद्धारकांचे, इसवी सन १९७७ हे जन्मसंवत्सर असून दि. २८ नोव्हेंबर १९७७ रोजी त्यांचा सत्त्याऐंशीवा स्मृतिदिन साजरा झाला.

( आ ) संत गाडगेमहाराज या पुरोगामी संतांचा जन्मशताब्दी समारोह पंढरपूर येथे दि. २२ ऑक्टोबर १९७७ रोजी उपराष्ट्रपती श्री. जत्ती यांच्या हस्ते साजरा झाला.

## ८. देवाघरी गेलेली देवमाणसे

( अ ) पुण्यातील श्री. ना. दा. ठाकरसी महिला महाविद्यालयातल्या मराठीच्या सेवानिवृत्त प्राध्यापिका मुक्ताबाई दीक्षित १४ ऑक्टोबर १९७७ रोजी कालवश झाल्या. ' कृष्णाबाई ' या टोपणनावाने ' मानसलहरी ' व ' अनिरुद्ध प्रवाह ' हे त्यांचे कथा-संग्रह प्रसिद्ध झाले. ' जुगार ' व ' अवलिया ' ही त्यांची नाटके गाजली. ' हे तों प्रचीतीचें बोलणें ' हे त्यांचे आत्मवृत्त अनेकांना आवडले.

( आ ) पुण्यातील ' ईशावास्य प्रकाशना 'चे संचालक व प्रसिद्ध संस्कृताभ्यासक मीमांसातीर्थ श्रीपादशास्त्री किंजवडेकर ( वय ६२ ) यांना दि. २१ ऑक्टोबर १९७७ रोजी देवाज्ञा झाली.

( इ ) ज्येष्ठ पत्रकार व नामवंत इतिहाससंशोधक श्री. अ. ज. करंदीकर ( वय ७७ ) यांचे दि. १ नोव्हेंबर १९७७ रोजी पुण्यात निधन झाले.

( ई ) श्रेष्ठ संगीत-दिग्दर्शक केशवराव भोळे दि. ९ नोव्हेंबर १९७७ रोजी कालवश झाले.

( उ ) ठाकरसी महिला विद्यापीठाच्या माजी कुलगुरू व त्या विद्यापीठाच्या आद्य आश्रयदात्या लेडी प्रेमलीला विठ्ठलदास ठाकरसी यांना दि. १ डिसेंबर १९७७ रोजी देवाज्ञा झाली.

( ऊ ) प्रसिद्ध भारतीय लेखक व स्वातंत्र्यसैनिक श्री. सुरेश वैद्य ( वय ६७ ) हे न्यूयॉर्क येथे दि. ६ डिसेंबर १९७७ रोजी निधन पावले.

( ए ) पुणे विद्यापीठाच्या वृत्तविद्या–विभागातील व्यासंगी प्राध्यापक **सीताराम रोकडोजी जगन्नाथ** ( वय ४८ ) दिल्लीस दि. ८ डिसेंबर १९७७ रोजी हृदयविकाराने निधन पावले.

( ऐ ) म. सा. परिषदेचे अध्यक्ष व रससिद्ध साहित्यिक **गजानन दिगंबर माडगूळकर** ( वय ५८ ) दि. १४–१२–१९७७ रोजी पुण्यास आपल्या ' पंचवटी ' या वास्तूमध्ये कालवश झाले.

( ओ ) रुपेरी पडद्यावरील विनोदाचे बादशहा **चॅर्ली चॅप्लिन** ( वय ८८ ) यांना स्वित्झरलॅंडमधील वेव्ही येथे दि. २५ डिसेंबर १९७७ रोजी मृत्यू आला.

( औ ) प्रसिद्ध हिंदी कवी व हिंदी साहित्यातील गूढवादाचे प्रणेते **सुमित्रानंदन पंत** ( वय ७७ ) हे दि. २८–१२–७७ रोजी दिवंगत झाले. ' चिदंबरा ' या त्यांच्या साहित्यकृतीला १९७१ चे ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले होते. ' सत्यकाम ' ही त्यांची शेवटची कृती महाकाव्य म्हणून गाजली.

( अं ) निष्ठावंत गांधीवादी नेते, थोर शिक्षणतज्ज्ञ व गुजरातचे माजी राज्यपाल **श्रीमन् नारायण** हे २ जानेवारी १९७८ रोजी ग्वाल्हेर मुक्कामी निधन पावले.

( अः ) ' नवभारत ' या मासिकाचे प्रवर्तक व माजी संपादक **प्रा. विठ्ठल महादेव बेडेकर** ( वय ७५ ) यांना पुण्यास दि. ३ जानेवारी १९७८ रोजी देवाज्ञा झाली. अमळनेरच्या खानदेश शिक्षण मंडळाचे आजीव सदस्य, संस्कृत—इंग्रजीचे उत्कृष्ट अध्यापक, साक्षेपी ग्रंथसमीक्षक, व्यासंगी संशोधक व राष्ट्रीयतेचे पुरस्कर्ते या विविध नात्यांनी ते सर्वज्ञात होते. भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, तत्त्वज्ञान महाकोश-मंडळ, समाज प्रबोधन संस्था इत्यादी संस्थांतून त्यांनी केलेले कार्य लाख मोलाचे आहे.

( क ) प्रसिद्ध साहित्यिक आणि संशोधक **प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित** (वय ७२) नागपूर मुक्कामी दि. २१ जानेवारी १९७८ रोजी कालवश झाले.

## ९. विद्यासेवकांचे सन्मान

( अ ) म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे एक सदस्य आणि पुण्यातील गरवारे महाविद्यालयातील हिंदीचे व्याख्याते **डॉ. अशोक प्रभाकर कामत** यांच्या ' सुभाषमय दिवस ' या अनुवादित मराठी पुस्तकास केंद्रीय हिंदी निदेशालयातर्फे १९७५ साली झालेल्या अखिल भारतीय अनुवाद स्पर्धेमध्ये श्रेष्ठ अनुवादाचे एक हजार रुपयांचे पारितोषिक मिळाले आहे. मानपुरी पदावली (१९६६), हिंदी और महाराष्ट्रका स्नेहबंध ( १९७३ ), महाराष्ट्रके नाथपंथीय कवियोंका हिंदी काव्य ( १९७६ ) इत्यादी हिंदी ग्रंथ; आणि संत रोहिदास : जीवन आणि वाङ्मय ( १९६६ ), आपला देश, आपली माणसे ( १९७६ ), पुण्यक्षेत्र आळंदी ( १९७७ ) इत्यादी मराठी ग्रंथ लिहून डॉ. कामतांनी यापूर्वीच आपले वाङ्मयीन कर्तृत्व सिद्ध केले आहे.

( आ ) जागतिक साहित्यक्षेत्रातील नोबेल पुरस्कार १९७७ साली स्पॅनिश ग्रंथकार

श्री. सेन्ते अलेक्सांद्रे ( व्हिन्सेन्ट अलेक्झांडर ) यांना मिळाला आहे.

(इ) दि. ९ ऑक्टोबर १९७७ रोजी लंडनमध्ये एशिअन आर्टिस्ट असोसिएशन—तर्फे श्री. किशोर वेंगुर्लेकर यांच्या 'अनारकली' या नाट्यप्रयोगाचा मुहूर्त झाला.

(ई) पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमधील मराठीचे अध्यापक श्री. दत्ता ना. वाळवेकर यांना नोव्हेंबर १९७७ मध्ये पुणे विद्यापीठाची डॉक्टरेट मिळाली. खत्री बोलीचा भाषाशास्त्रीय व वाङ्मयीन अभ्यास सिद्ध करणारा प्रबंध डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या मार्गदर्शनाखाली वाळवेकरांनी सादर केला.

(उ) श्री. आत्माराम रावजी देशपांडे ऊर्फ कवी अनिल यांच्या 'दशपदी' या काव्यसंग्रहास साहित्य अकादमीचा १९७७ चा पुरस्कार मिळाला.

(ऊ) पुण्यातील आनंद मुद्रणालयाचे संचालक श्री. य. गो. ऊर्फ दादासाहेब जोशी यांना महाराष्ट्र मुद्रणपरिषदेच्या अध्यक्षपदाचा सन्मान लाभला.

(ए) प्रसिद्ध कोकणी साहित्यिक श्री. रवींद्र केळेकर यांना साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले.

(ऐ) पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयातील मराठी विभागाचे प्रमुख आणि म. सा. परिषदेचे एक उपाध्यक्ष **डॉ. विनायक रामचंद्र ऊर्फ मोहनराव करंदीकर** यांची नुकतीच एका नव्या पदावर नियुक्त झाली आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति-मंडळाने पुण्यातील शब्दकोश प्रकल्पाचे प्रमुख संपादक म्हणून डॉ. मोहनराव करंदीकरांना पाचारण केले आहे; व ते लवकरच या कामाची सूत्रे हाती घेणार आहेत. 'वामनपंडितांची यथार्थदीपिका' आणि 'भगवद्गीतेचे तीन टीकाकार' हे डॉ. करंदीकरांचे दोन ग्रंथ त्यांच्या पांडित्याचे प्रभावी पुरावे आहेत. सुजनता, समधातता, सूक्ष्माभ्यासपरता आणि समन्वयशीलता या आपल्या अभिजात गुणविशेषांनी डॉ. करंदीकर ही नवी जबाबदारी समर्थपणे पार पाडतील, यात मुळीच संदेह नाही. डेक्कन एज्युकेशन सोसायटीतील प्रदीर्घ आणि यशस्वी सेवेचा कालखंड पुरा करून, योग्य वेळी डॉ. करंदीकर हे नव्या कार्यक्षेत्रात प्रविष्ट होत आहेत.

(ओ) पुणे विद्यापीठाच्या 'कै. न. चिं. केळकर व्याख्यानमाले'तर्फे प्रा. डॉ. विद्याधर पुंडलिक यांनी अहमदनगर येथे दि. ९ ते १३ डिसेंबर १९७७ रोजी 'धर्म आणि निधर्म' या विषयावर पाच अभ्यासपूर्ण व्याख्याने दिली.

(औ) डॉ. वसंत स. जोशी यांच्या 'संशोधन साधना' या ग्रंथास शिवाजी विद्यापीठाचे पाचशे रुपयांचे पारितोषिक मिळाले.

(अं) प्राचार्य बलवंत देशमुख यांच्या 'खाडिलकर यांचे नाट्यसुवर्ण' या ग्रंथास शिवाजी विद्यापीठाचे पारितोषिक मिळाले.

—सरस्वतीच्या दरबारातील या सर्व मानकऱ्यांचे मनःपूर्वक अभिनंदन !

दि. २२ जानेवारी १९७८.

**हे. वि. इनामदार**

# रसज्ञ ' पंडित ' हरपले !

**म. श्री. दीक्षित**

**प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित** हे अर्धांगाच्या विकाराने शनिवार दि. २१ जानेवारी रोजी, नागपूर येथे श्रद्धानंद पेठेतील स्वतःच्या ' श्रीधरसदना 'त, वयाच्या ७२ व्या वर्षी निधन पावले. त्यांच्या निधनामुळे एक कुशल प्राध्यापक, राजकवी तांबे संप्रदायाचा समर्थ भाष्यकार, रससिद्ध कवी आणि व्यासंगी काव्यसमीक्षक हरपला.

प्रा. पंडित यांची प्रकृती गेली दोनतीन वर्षे खालावत होती. मध्यंतरी त्यांना हृदय-विकाराचा झटका आलेला होता. पण अशा अवस्थेतही त्यांचे वाचनलेखन चालू असे. त्यांच्या काव्यशास्त्रविनोदविषयक गप्पात कधीच खंड नसे. पंडितांना पुण्या-मुंबईची ओढ जबरदस्त होती. विद्यापीठीय कामाच्या अथवा व्याख्यानाच्या निमित्ताने पुण्या-मुंबईकडे ते दरवर्षी येत आणि अनेक समव्यावसायिकांच्या गाठीभेटी घेऊन दिलखुलासपणे गप्पागोष्टी करीत. त्यामुळे त्यांच्या निधनाचा धक्का नागपूरविदर्भा-प्रमाणे पश्चिम महाराष्ट्रातील त्यांच्या शेकडो मित्रमंडळींना जाणवेल आणि सर्व काव्य-रसिक हळहळतील यात शंका नाही.

भवानीशंकर हे मूळचे सातारा जिल्ह्यातील वाईचे. त्यांचा जन्मही वाईचा. ( २८ एप्रिल १९०६ ) वाईविषयी ते मोठा अभिमान बाळगीत. वडिलांच्या नोकरीनिमित्ताने त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण राजपुतान्यात आणि उच्च शिक्षण नागपुरास झाले. राजपुताना आणि माळवा या भागातील वास्तव्यामुळे पंडितांचा हिंदी भाषेशी चांगला संपर्क आला. मराठी आणि संस्कृत हे तर त्यांच्या आवडीचेच विषय होते. साहित्याबरोबर इतिहास या विषयातही त्यांना विलक्षण रस होता. राजपूत–मराठा इतिहासातील अनेक विषयांवर त्यांनी जे आरंभी लेखन केले त्याची प्रेरणा आपल्याला राजस्तान–मालव भूमीने दिली असे ते वारंवार सांगत.

पुढे मराठीच्या अध्ययन–अध्यापनासाठी पंडित नागपूरला जे आले, ते तिथेच कायम रमले. १९३७ ते १९४५ ही आठ वर्षे ते हिस्लॉप कॉलेजमध्ये आणि १९४५ पासून १९६१ पर्यंत मॉरिस कॉलेजात प्राध्यापक होते. पुढली आठनऊ वर्षे नागपूर विद्यापीठात पदव्युत्तर अभ्यासक्रमाचे प्रमुख म्हणून त्यांनी उत्तम कामगिरी बजावली. १९६९ ते १९७२ या तीन वर्षात विद्यापीठ अनुदान मंडळाचे सेवानिवृत्त प्राध्यापक

अनुक्रमणिका

म्हणून ते कार्यरत होते. या सर्व काळात पंडितांनी अध्यापक म्हणून फार चांगला लौकिक संपादन केला.

प्रस्तुत लेखकाला १९४२ ते १९४४ या दोन वर्षांत पंडितांच्या अध्यापन-कौशल्याचा लाभ मिळाला होता. कै. डॉ. शं. दा. पेंडसे आणि प्रा. भ. श्री. पंडित हे दोघे त्या काळात हिस्लॉप कॉलेजमध्ये मराठी शिकवीत. शिकवण्यात दोघांचा असा हातखंडा होता की, त्यांच्यात श्रेष्ठ–कनिष्ठ ठरविणे कठीण. कै. पेंडसे गद्यविभाग तर कै. पंडित काव्यविभाग शिकवीत असत. डॉ. पेंडसे हे गंभीर प्रकृतीचे, तर पंडित विनोदी आणि गोष्टीवेल्हाळ. विनोदामुळे व पाठांतरशक्ती यामुळे पंडितांचे वर्ग विलक्षण रंगत. कबीर, तुलसीदास, मीराबाई, तुकाराम आणि तांबे यांच्या काव्यांतील उताऱ्यांच्या उतारे ते धडाधड म्हणून दाखवीत. रसोद्ग्राही पद्धतीने कवितेचे अंतरंग–बहिरंग खुलवून सांगणारा पंडितांसारखा प्राध्यापक माझ्यातरी ऐकण्यात नाही. वृत्त, छंद, लय, रचना, आशय, अलंकारसौंदर्य इत्यादी काव्याची सर्व अंगे ते अगदी समरसून उलगडून दाखवीत. विद्यार्थ्यांस विषयाची गोडी लावून त्याला अधिक अभ्यासास उत्तेजित करणे ही जर कुशल अध्यापकाची कसोटी मानली, तर पंडित या कसोटीला पुरेपूर उतरणारे होते. त्यांचे अनेक विद्यार्थी आज साहित्य, संशोधन आणि शिक्षण या क्षेत्रांत नावलौकिकास चढल्याचे दिसून येईल. मला स्वतःला साहित्याची गोडी लागली ती पेंडसे–पंडित या दोन गुरुवर्यांमुळे.

कै. पंडित यांच्या कर्तृत्वाचा याहून मोठा भाग म्हणजे त्यांची काव्यसेवा. कवी आणि काव्यसमीक्षक अशा दुहेरी नात्याने त्यांनी मराठी काव्यक्षेत्रात सुमारे पंचवीस एक छोटेमोठे ग्रंथ लिहून मोलाची भर घातली आहे. याबाबतीत आदरणीय प्रा. रा. श्री. जोग यांच्याशीच त्यांची तुलना होऊ शकेल. कविवर्य तांबे हे काव्यक्षेत्रातील कै. पंडित यांचे श्रद्धास्थान होते. तांबे यांच्या प्रेरणेनेच ते काव्यरचना करू लागले आणि पुढे पुढे तांबे संप्रदायाशी ते इतके समरस झाले की, त्या संप्रदायाचे ते एक प्रमुख भाष्यकार बनले. ' पिचलेला पावा ', ' उन्मेष आणि उद्रेक ', ' सुवास आणि रस ' या तीन संग्रहांत पंडितांची भावकविता संग्रहित आहे. ' बीजेची कोर ', ' चवथीचा चांद ', ' चांदोबा आणि इतर कविता ' अशा पाचसात संग्रहांत त्यांची शिशुगीते समाविष्ट आहेत. पण एवढी उत्कट, सरस कविता निर्मूनही पंडितांना कवी म्हणून मोठी ख्याती लाभली असे नाही. रविकिरण-मंडळाच्या आणि तांबे संप्रदायाच्या सावलीत तिची वाढ झाली असल्यामुळे तिला स्वतंत्र अस्तित्व प्रस्थापित करता आले नसावे. सफाईदार रचना करणारा तांबेसंप्रदायातील एक बिनीचा भावकवी या शब्दांत पंडितांची योग्यता वर्णिता येईल.

कवी या नात्यापेक्षा काव्यसमीक्षक म्हणून पंडितांनी लिहिलेले ग्रंथ, संपादिलेले कवितासंग्रह हा मात्र मराठी अभ्यासकांचा एक अमोल ठेवा आहे. त्यांना ' रसज्ञ

पंडित' म्हणावेसे वाटते ते या वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथनिर्मितीसाठी. कै. जोग यांच्या नंतर 'अर्वाचीन मराठी काव्या'चे तपशीलवार आलोचन पंडितांनी आपल्या 'आधुनिक मराठी कविता' या ग्रंथात केले आहे. हे दोन्ही ग्रंथ अभ्यासल्याशिवाय अव्वल इंग्रजी ते मर्ढेकर या कालखंडाची पुढची वाट कोणासही दिसणार नाही. कविचरित्राची तपासणी, कवीच्या समग्र कवितेचा शोध आणि या दोन्ही क्रियांच्या परिपूर्तीनंतर रसोद्ग्राही पद्धतीने घडविलेले काव्यदर्शन–तेही सडेतोडे भाषेत – हा पंडितांच्या ग्रंथांचा विशेष सांगता येईल. रेंदाळकर, विनायक आणि केशवसुत यांच्या कवितांचे संपादन त्यांनी असेच कष्टाने नि साक्षेपाने केले आहे. 'आधुनिक कवितेचे प्रणेते' (दोन भागांत) हा त्यांचा ग्रंथ म्हणजे स्वातंत्र्यपूर्व काळातील काही श्रेष्ठ कवींना वाहिलेली श्रद्धांजलीच म्हणावी लागेल. त्यांच्या 'आधुनिक मराठी कविता' या ग्रंथाचा हा पूरक ग्रंथ आहे. पंडितांचा चोकस, चोखंदळ, बहुश्रुत, काहीसा फटकळ स्वभाव आणि मराठी काव्यविषयीची त्यांची डोळस भक्ती यांची साक्ष देणारे त्यांचे हे ग्रंथ मराठी वाङ्मयेतिहासाच्या अभ्यासकांना नित्य उपयोगी पडणारे आहेत.

पंडित हे साहित्य परिषदेचे जुने आजीव सदस्य होते. परिषदेविषयी त्यांना जिव्हाळा होता. विदर्भ, मुंबई, पुणे यांच्या प्रादेशिक अभिमानापासून ते सदैव दूर होते. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे ते एकदा क्रियाशील सभासद होते. साहित्य-पत्रिकेत त्यांचे अनेक लेख आणि परीक्षणे प्रसिद्ध झाली आहेत. परिषदेची 'टेंबे व्याख्यान माला' त्यांनी कोल्हापूरला गुंफली होती. वाङ्मयेतिहासाच्या कै. जोग संपादित चौथ्या खंडातील काव्यविषयक विस्तृत प्रकरण त्यांनीच लिहिले. कै. जोग यांना त्यात कसालाही फेरफार करावा लागला नाही. पंडित पुण्यास आले की, परिषदेत आपणहून येत व चौकसपणे सर्वांशी गप्पागोष्टी करीत. फटकळ बोलणारा वक्ता म्हणून माधव जूलियन-स्मृतिदिनी त्यांनी एकदा माधवमित्रांची नाराजीही ओढवून घेतली होती. नवी माहिती, नवे संदर्भ पुरविण्यात ते सदा तत्पर असत. शिक्षण आणि साहित्य या दोन क्षेत्रांत पन्नास वर्षे निष्ठापूर्वक वावरणारे पंडित आपला प्रपंचही तितक्याच नेटाने सांभाळीत होते. त्यांच्या मागे श्रीमती प्रतिभाताई, तीन कर्ते सुपुत्र आणि एक सुखी कन्या असा परिवार आहे. पंडितांसारखा जाणकार सरस्वती-पुत्र आता हरपला आहे. ईश्वर या कबीर-तांत्रे भक्तास खचितच सद्गती देईल.



# ही खंत फार मोठी आहे....

श्रीधर गजानन माडगूळकर

पपा, तुमची किती रूपं आज डोळयांपुढं तरंगताहेत म्हणून सांगू ?...व्हरांड्यातल्या निळ्या कोचावर बसून मित्रांच्या गराड्यात दिलखुलास हसणारे...वरच्या दिवाणखान्यात चष्मा घालून गंभीरपणे लिहिणारे...लहानपणी, जेवणाच्या टेबलावर बसून अभ्यासाबद्दल आम्हा मुलांची हजेरी घेणारे.. सभा-संमेलनात आपल्या अमोघ वक्तृत्वानं हजारो श्रोत्यांना मंत्रमुग्ध करणारे...नातवंडांच्या बरोबर बोबडं बोलणारे ...माडगूळच्या विहिरीत उघड्या अंगानं उडी टाकणारे...गावकऱ्यांच्या गप्पांत गुंतलेले...पंचवटीच्या बागेतल्या कवटीचाफ्याला पहिलं फूल आलं, ही गोष्ट साऱ्या घराला कौतुकानं सांगणारे...सत्काराच्या माळा गळ्यात मिरवीत पंचवटीत येणारे... हसवणारे...रागावणारे...धीर देणारे...आशीर्वाद देणारे पपा...

पपा, १५ डिसेंबरला आपल्या बंगल्यापासून...हो हो, घरावरून नव्हे,अगदी तुमच्या लाडक्या 'पंचवटी'पासूनच पालखी निघाली होती...पालखीबरोबर हजारो माणसे होती...पालखी खरं तर रेल्वेच्या पुलावरून सरळ जंगलीमहाराज रस्त्यानं जाणार होती. पण आपल्या वाकडेवाडीतील लोक...त्यांनी हट्टानं ती वाडीतून न्यायला लावली. दोन्ही बाजूला जनसागर लोटला होता....माणसं फुलं उधळत होती...हात जोडत होती...पण तेव्हा मला एक कळलं नाही की, ती रडत का होती ? कदाचित एवढ्या मोठ्या सत्पुरुषाचं जवळून दर्शन झालं, म्हणून त्यांचे ते आनंदाश्रूही असतील !... आणि पपा, त्या पालखीबरोबर मीसुद्धा होतो...अगदी सगळ्यांच्या पुढं...मला सांगितलं होतं की, 'मागं बघू नकोस'; आणि माझ्या हातात एक अग्निकुंभसुद्धा दिला होता. पपा, मला कळत नव्हतं की पालखी कुणाची आहे ? कुठे चाललीय ?...फक्त आपल्या समोरच्या कॉलनीतील राजाभाऊंचे शब्द कानांत घुमत होते..." अगदी ज्ञानेश्वर माऊलींची पालखी निघाल्यासारखी वाटतेय !..."

—पण आता सारंच कळलंय...जाणवतंय...पपा, तुम्ही आम्हांला सोडून गेलात ना ? फसवून गेलात ना ? पण तसंही म्हणता येणार नाही...आठ दिवस आधीच तुम्ही ताईला सांगितलं होतं की, तुझ्या मनाची,...मुलांच्या मनाची तयारी कर... आम्ही काही सांगायला गेलो की, म्हणायचेत, " मी आता अनंताच्या पर्यटनाला

अनुक्रमणिका

निघालेला प्रवासी आहे...'' आमचा विश्वास बसला नाही. कसा बसणार ?... सारे डॉक्टर्स एकमतानं सांगत होते की, " पपांना काहीसुद्धा झालेलं नाही ! "

पपा, तुम्हांला आठवतंय ? " मी निवडणुकीला उभा राहू का ? " असं मी तुम्हाला काही दिवसांपूर्वीच विचारल्यावर तुम्ही म्हणाला होता, " जर पराभव पचवायची हिंमत असेल तर जरूर उभा राहा. "...प्रत्यक्ष पित्याचा जीव यमदेव आपल्या डोळयांसमोरून ओढून नेत असताना आपण काहीच करू शकलो नाही...यापेक्षा मोठा पराभव जगात दुसरा असू शकेल काय ?...पपा, तुम्ही खरोखर द्रष्टे होता.

पपा, तुम्ही गेल्यापासून तुमचं ' नागडं नातवंड '—अडीच वर्षांचा सुमित्र-सारखा म्हणतोय, ' पपा, आजोबा गेले गावाला, चैन पडेना आम्हांला.'' पपा, सुमित्ला तुम्ही बाराखडी शिकवणार होता ना ? मग असं का केलंत ? आता त्याला ' ग ' हे अक्षर गिरविताना काय सांगणार ? गजाननतला ' ग ' की ' गदिमा 'तला ' ग ' ? पपा, तो त्याचं नाव काय सांगतोय माहीत आहे ? ' सुमित्र श्रीधर गजानन माडगूळकर' ...त्याच्यावर तुम्ही लिहिलेल्या ' आल गट्टी गाल गट्टी, सोन्याशी गट्टी फू ' या कवितेवरची शाई वाळण्यापूर्वीच तुम्ही आम्हा साऱ्यांशी खरोखरच कायमची गट्टी फू करून गेलात ना ?

पपा, तुम्ही गेलात तर संपूर्ण माडगूळ गावानं तेरा दिवस सुतक पाळलं...गावच्या इतिहासात पहिल्यांदा यंदा गावची सटीची यात्रा भरली नाही...जगन्नाथ पाटलांची भावजय म्हणाली, " गावचा कळस देवानं कापून नेला, अण्णाची समाधी बांधू नका. देऊळ बांधा...साऱ्या गोरगरिबाला नवसाला पावल. "

पपा, सारे लोक गावाचं नाव लावतात. तुम्ही गावालाच नाव दिलंत...मध्ये दुष्काळात आपल्या गावची स्थिती फार वाईट होती. मोठमोठे तालेवार शेतकरी साध्या अन्नाला महाग झाले...सारे गावकरी जगायला कोल्हापूर भागात गेले होते. तेव्हा तिथं त्यांनी गावचं नाव सांगितल्यावर तिथल्या लोकांनी, पाहुण्यांची करावी तशी त्यांची सरबराई केली होती. परवा गावचे लोक डोळयांतून पाणी काढून त्या आठवणी सांगत होते.

पपा, तुमचं प्राणप्रिय माडगूळ...तिथं तुम्ही कष्टानं उभारलेली शेती...घर... ' बामणाचा पत्रा '...इंजिनचा मळा...महाराष्ट्र सारस्वतात कौतुकपात्र झालेली ' माणदेशी माणसं '... सगळं सोडून तुम्हांला कसं जाववलं ?

आणि पुण्यात...तुम्ही आपल्या पंखाखाली प्रेमानं वाढवलेली पिल्लं आताच कुठं उडायला लागली होती नं ?...आपल्या इवल्याशा पंखांना इजा झाली तरी, तुम्ही नुसते पाठीशी आहात, या कल्पनेनं पुन्हा उभारी घेत होती ना ? उद्या मोठे झाल्यावर हे वैनतेय कुणाच्या कौतुकासाठी गगनभरारी मारणार ! ' जयदेवा ' असा धीर-गंभीर आशीर्वाद त्यांच्या मस्तकावर हात टेवून कोण देणार ?

पपा...दोन वर्षांपूर्वी कॅन्सरसारख्या रोगावर मात करून तुम्ही घरी आलात, तेव्हा सारी पंचवटी आनंदाने न्हाली होती...त्या वेळेस हातात पंचारती घेऊन तुम्हांला ओवाळणारी सुवासिनी ताई...ते ओलं चित्र इतक्या लवकर कसं हो निसटलं? पपा,...तुम्ही फार स्वाभिमानी होता...परावलंबी जीवन तुमच्या कोशात वसत नव्हतं. ...मोठ्या ऑपरेशनमुळं 'आपण दुबळे झालो' असं तर तुम्हांला वाटलं नाही ना?

पपा, नुकत्याच झालेल्या साहित्य संमेलनात माजी अध्यक्षांनी केलेला तुमचा पाण-उतारा तुमच्या कविहृदयाला खूप सलला ना? त्याच काळात लिहिलेल्या तुमच्या इतर कविता त्यांनी वाचल्या असल्या तरी त्यांच्या हातून असा प्रमाद घडताना! सत्तेचाळीस सालीच तुम्ही आपल्या पुतण्याचं नाव 'जयप्रकाश' असं टेवलं, ते 'जे. पीं.' विषयी वाटणाऱ्या प्रेमादरापोटीच ना?...'स्वातंत्र्याला पर्याय नाही' या घोषवाक्याचा जन्मभर पाठपुरावा करीत, मोठमोठ्या अधिकारपदांवर लाथ मारणारा तुमच्यासारखा परशुराम स्वप्नातसुद्धा असं लिहील काय? त्या बेजबाबदार उक्तीवर तुम्ही भाष्य केलंत-ते कृतीचं...त्या वेळेस तुम्ही स्वतःच्या मस्तकावर मारलेल्या हातानं तुमची आयुष्यरेषा तर निखळली नाही ना?

पपा, सगळे लोक सांगतात, तुम्ही चिरंजीव आहात....वहिनींच्या कपाळाचं कुंकू वाढवू नका...अण्णांच्या मागं 'कै.' असं लावू नका...हे सारं प्रेम उमगतं...पण पटत नाही!

पपा, चवळीच्या शेंगेसारखी नाजूक लावणी लिहिणारा शाहीर...उभ्या महाराष्ट्राला वेड लावणाऱ्या गीतरामायणाचा जन्मदाता...राजकारणात आणि जनमानसात मानाचं पान असलेला...पिता, पुत्र, पती, भाऊ, मित्र, लेखक, राजकारणी ...अशा कित्येक भूमिका एकाच वेळेस तितक्याच तन्मयतेनं रंगविणारा नटसम्राट ...माडगूळकर घराण्याचा मानदंड...आणि यापेक्षाही अत्यंत जवळचे, आमचे लाडके पपा आम्हांला आता कधीच दिसणार नाहीत...बोलणार नाहीत...हे खरं आहे का?

पपा, तुमच्या लाडक्या 'पंचवटी'तील वेलींवर अनेक कळ्या उमलतील; पण त्यांचं कौतुक करायला तुम्ही असणार नाही, ही खंत फार मोठी आहे...फार, फार मोठी आहे...!

* * *

## साभार स्वीकार

समीक्षा

सारडा शंकर : गुलमोहोर, साधना प्रकाशन, पुणे ३०, रु. २०.

अनुक्रमणिका

# ठेविली अभंग स्मृती मागे

## मधुकर कुलकर्णी

आयुष्यात काही काही योग विचित्र येतात. ग. दि. ऊर्फ अण्णासाहेब माडगूळकर यांच्यासारख्या जिव्हाळयाच्या ज्येष्ठ स्नेह्याचं जाणं हा असाच दुर्दैवी योग. त्यांचा माझा स्नेह जवळजवळ छत्तीस–सदतीस वर्षांचा. अनेक दिवस, अनेक रात्री आम्ही एकत्र काढल्या. सुखदुःखाचे कित्येक प्रसंग एकत्र झेलले. पण अशा या मित्राचं मला अखेरचं दर्शनही घडू नये, हे केवढं दुर्भाग्य ! माझ्या काळजात ही खंत आयुष्य-भर सलत राहील.

अशा वेळी माणूस खरं तर काय लिहिणार ? काय बोलणार ? पण काहीच केलं नाही तर मी माझ्या कर्तव्याला चुकलो, असं होईल. कारण मी जो आज आयुष्यात उभा आहे, ती अण्णांचीच कृपा आणि माझ्या लेखणीतून चार वेडेवाकडे शब्द निघतील, तीही त्यांचीच कृपा.

अण्णांच्या निधनाची ही दुःखद वार्ता मला कळली बेळगावी. मी त्यावेळी आईच्या वर्षश्राद्धात गुंतलो होतो. सगळं उरकून पुण्यात आलो आणि अण्णांच्या घरी धावलो. रिक्षात बसलो आणि म्हटलं,

" वाकडेवाडी—"

रिक्षावाल्यानं विचारलं,

" अण्णांच्याकडं का ? "

" होय. "

" साहेब, तुम्ही परवा नव्हता का ? "

त्या फटकाऱ्यानं मला अपराध्यासारखं झालं आणि मी म्हटलं,

" नव्हतो. त्या वेळी मी खूप दूर होतो. त्यामुळं येऊ शकलो नाही. तुम्ही गेला होता का ? "

'गेलो होतो म्हणजे काय ? रिक्षा बंद ठेवून गेलो होतो. अहो साहेब, आळंदीच्या ज्ञानेश्वर महाराजांच्यासारखी पालखी निघाल्यावर त्यात सामील झाल्याशिवाय कोण कसं राहील ? "

सामान्य वाटणाऱ्या रिक्षावाल्यानं ज्या माडगूळकरांना ज्ञानदेवांच्या जोडीला नेऊन

अनुक्रमणिका

वसवलं, त्यांच्या कवित्वाचा आपण आणखी सन्मान तो काय करणार ?

माडगूळकर या नावाला राजमुद्रेचं वैभव लाभण्यापूर्वीचा तो काळ. नशीब काढण्यासाठी हा माणदेशी माणूस कोल्हापुरास गेला आणि आपल्या प्रासादिक आणि रसाळ लेखणीवाणीनं गेली अडीच तपं अवघ्या मराठी मनावर अधिराज्य गाजवत राहिला.

अग्रगण्य चित्रपटकथालेखक, सिद्धहस्त कवी आणि अभिजात अभिनेता म्हणून अण्णा ख्यातनाम झाले. या तिन्ही क्षेत्रांत उमटलेले या माणसाच्या पावलांचे ठसे कधीही पुसले जाणार नाहीत. किंबहुना, त्या क्षेत्रात नव्यानं पदार्पण करणाऱ्यांना त्यांचा मागोवा घेतच पुढं जावं लागेल.

अण्णांची व माझी पहिली भेट झाली कोल्हापुरात श्री. परशुरामपंत सोळांपूरकर मास्तरांच्या यशवंत संगीत विद्यालयात. हा काळ मेळ्यांचा होता. 'गंधर्व निकेतन मेळा' होता, 'आदर्श मेळा' होता. त्यांत सुधीर फडके होते आणि 'यशवंत संगीत मेळ्याचे लेखक, दिग्दर्शक, कवी सर्वेसर्वा माडगूळकर हे या मेळ्याचं खरं बळ होतं. साहित्यसाधना चालू होती आणि चरितार्थ चालत होता अभिनयावर. 'हंस–पिक्चर्स'-मध्ये ते हरहुन्नरी नट म्हणून दाखल झाले होते. सगळं कोल्हापूर त्यांना 'औंधकर कवी' म्हणूनच ओळखत होतं. 'कवी' म्हणण्यात त्यांच्या कवित्वाचा गौरव होता, तर 'औंधकर' म्हणण्यात त्यांच्या अभिनय-सामर्थ्याचा गौरव होता. कारण औंधचे राजे कै. भवानराव पंत प्रतिनिधी यांची नक्कल ते अप्रतिम करीत. त्यांच्या हरहुन्नरी स्वभावामुळं आणि गीतनिर्मितीची उपजत कळा अंगी असल्यामुळं मैफली रंगत गेल्या. मंडळीही वाढत गेली.

आम्ही साहित्यप्रेमी व चित्रपटप्रेमी तरुण तर अण्णांच्या सहवासात वेडे झालोच; पण कै. शाहीर लहरी हैदर, त्यांचे शिष्य शाहीर तिलक पिराजीराव सरनाईक, शाहीर शंकरराव सप्रे, (संगीत दिग्दर्शक कै. वसंत पवार यांचे वडील) संगीतकार कै. शंकरराव पवार, मा. ग. मातकर, सुधीर फडके आणि अनेक गायकगायिका त्यांच्या मेळाव्यात सामील झाल्या. यशवंत संगीत विद्यालयातली एक साधी, सालस, सद्गुणी आणि गोड गळ्याची मुलगी अंबू पाटणकर म्हणजेच आजच्या सौ. विद्यादेवी गजानन माडगूळकर, आम्हा लक्ष्मण मित्रांच्या प्रेमळ 'वहिनी!'

१९४२ साली ही लक्ष्मी सोन्याच्या पावलांनी माडगूळकरांच्या आयुष्यात आली; आणि त्यांच्या भाग्याची पहाट झाली. 'पहिला पाळणा' या चित्रपटानं, गीतकार म्हणून त्यांचं नामकरण केलं आणि पुढं शेकडो चित्रपटांचे पाळणे त्यांच्या नावानं हलले. पण त्यांची सर्वस्पर्शी प्रतिभा केवळ गीतलेखनावर थोडीच थांबणार? त्यांना कथा, पटकथा, संवाद या क्षेत्रांतही प्रवेश हवा होता. भालजी पेंढारकर, कै. बाबूराव पेंटर, कै. बाबूराव पेंढारकर आणि कै. भाऊसाहेब खांडेकर यांच्या सहवासात त्यांना

तीही संधी लाभली. 'राम जोशी' या चित्रपटानंतर अण्णांना शांतारामबापूंच्या-बरोबर कथा, पटकथा, संवाद, गीत आणि अभिनय अशा सर्वत्र क्षेत्रांत हिरीरीनं काम करण्याची संधी मिळाली. ती त्यांनी सार्थ करून दाखवल्यामुळं मराठी चित्रपट-सृष्टीत त्यांच्या नाममुद्रेला 'तिळा उघड 'चं महत्त्व आलं.

इथून पुढं अण्णांच्या आकांक्षेला नवे पंख फुटले. ते पुण्याला प्रभात फिल्म कंपनीत आले. इथं आल्यावर अनेक कंपन्यांशी त्यांचा संबंध आला. 'सीता-स्वयंवर', 'मायाबाजार', 'पुढचं पाऊल', 'जिवाचा सखा', 'जशास तसं', 'देव पावला', 'बाळा जो जो रे'. 'मानाचं पान', 'वंशाचा दिवा' हे चित्रपट त्यांच्या बहुरंगी, बहुढंगी प्रतिभेतून फुलले. पुढं तर राजाभाऊ परांजपे यांच्या संगतीत 'पेडगावचे शहाणे', 'ऊन पाऊस', व 'लाखाची गोष्ट' या चित्रपटांनी त्यांना लोकप्रियतेच्या शिखरावर नेऊन बसवलं. 'प्रपंच', 'जगाच्या पाठीवर', 'सुवासिनी' वगैरे नंतरचे चित्रपटही अविस्मरणीय ठरले.

अण्णांनी चित्रपटसृष्टीला आणि चित्रपटसृष्टीतल्या कलावंतांना समाजात मानाचं स्थान मिळवून दिलं. लेखकाचं स्थान हे इतरांपेक्षा एक अंगुळभर वर असतं, हेही स्वतःच्या कर्तृत्वानं आणि निष्कलंक चारित्र्यानं त्यांनी सर्वांना दाखवून दिलं. त्यांच्या या कर्तृत्वाचा राष्ट्रपतींनीही गौरव केला होता. साहित्यातली व चित्रपटक्षेत्रांतली अनेक पारितोषिकं त्यांना मिळाली. अगदी घरात ठेवायला जागा नाही एवढी. पण या सर्व राजसन्मानांपेक्षाही गीतरामायणानं त्यांना जी 'आधुनिक वाल्मीकी' ही पदवी मिळवून दिली, तिला तोड नाही. या भाग्याला जोड नाही.

अण्णांचं लेखन म्हणजे ईश्वरदत्त प्रतिभा आणि सहज शैलीची अद्‌भुत शक्ती यांचा सुरेख संगमच. नाद, नाट्यमयता आणि चित्रमयता हे त्यांच्या लेखनाचे अलौकिक विशेष. कथेतला प्रसंग असो की, एखाद्या कवितेची किंवा गीताची ओळ असे, ती ऐकल्याबरोबर आपल्या डोळ्यांपुढं चलत् चित्र दिसू लागतं, शब्द, शब्द आपल्याशी बोलू लागतो, क्षणात आपल्याला जिंकून टाकतो. जसेच्या तसे प्रसंग शब्दांनी उभे करण्याच्या किमयेमुळंच ते यशस्वी पटकथाकार आणि संवाद—लेखक ठरले.

अण्णांना ही कला जन्मजातच लाभली होती. संत, पंत आणि तंत साहित्य त्यांच्या रक्तात भिनलेलं होतं. पण बाहेर येताना ते आपल्या जनकाचा तोंडवळा घेऊन यायचं-पारिजातकाची डहाळी हलवल्यावर जसा एका क्षणात सुंदर, नाजूक फुलांचा सडा पडावा, तितक्या सहजतेने आणि तितकीच सुंदर गीतं ते लिहीत. क्षणात गुलाबी लावणी जन्मेल, दुसऱ्या क्षणी भगवा अभंग अवतरेल, तर तिसऱ्या क्षणी तीर्थात न्हालेली भूपाळी उगवेल. काकडारतीत आणि शेजारतीत प्रत्यक्ष चार प्रहरांचा तरी काळ जातो, पण इथं काही थोड्या मिनिटांतच हा सर्व सोहळा पुरा होतो. अण्णांनी

अशी अनेक गीतं, प्रसंग सहज लिहिली आहेत.

'रामजोशी' या चित्रपटकथा लेखनाच्या वेळची गोष्ट. अण्णा प्रसंगामागून प्रसंग-संवादांसह आणि हालचालींच्या वारकाव्यासह सांगू लागत आणि समोर सच्चिदानंद-बाबाच्या भूमिकेत बसून मी शब्दन् शब्द आदरानं टिपून घेई. प्रसंग सुरू झाला की, ते पात्र ज्या पद्धतीनं बोलेल, तसे ते बोलत, तसे ते हावभाव करीत. कधी कधी हा अभिनय इतका जिवंत आणि उत्कट असे की, या त्यांच्या चेहऱ्याकडं भान हरपून मी पाहतच राहायचा. सगळं संपलं की, मला जाग यायची आणि मग तेही हसत म्हणायचे,

"लिहायचं राहिलं ना? चला, 'री-टेक'. चांगला शॉट कधी पहिल्या टेक्‌ला ओ. के. होत नाही."

—आणि मग पुन्हा तोच प्रतिभेचा खेळ सुरू व्हायचा. अशा पद्धतीनं, म्हणजे संवाद लिहिता लिहिताच गीत आलं की, लगेच गीत आणि मग पुढं संवाद असा अखंड लेखनप्रवाह न थांबता चालू राहायचा. 'राम जोशी' या चित्रपटाचं सबंध स्क्रिप्ट पटकथा–संवाद–गीतांसह त्यांनी तीन दिवस आणि तीन रात्री अशा पद्धतीनं पूर्ण केलं होतं. या कथेचा कथाभाग प्रत्यक्ष पडद्यावर जेवढा आला, त्यापेक्षा कितीतरी भाग तसाच अंधारात राहिला. 'रामजोशी'मधील उरलेल्या लावण्याचा शोध लागला तर माडगूळकरांच्या कर्तृत्वाचा आणखी एक नवा पैलू लोकांना दिपवून टाकील. त्यांतली एक लावणी अशी होती: रामजोशी बयेला जिंकल्यावर फडात लावणी म्हणतात असा प्रसंग होता. बयेनं ज्या प्रसंगी त्यांना कायमचं जिंकलं, त्या प्रसंगाचं चित्र त्या लावणीच्या शब्दाशब्दांतून रंगलं होतं. रामजोशांना बयेच्या रूपात सर्वांगी भिजलेली राधाच दिसते. रामजोशी म्हणतात,

"सर्वांगी राधिका भिजली, लाजेनं थिजली,
कमरभर जली, उभा श्रीरंग;
जरतारि तरल वसनात, तनुलता स्नात,
भरे नयनात आतला रंग!"

—असा होता रामजोशीरूप झालेल्या माडगूळकरांच्या लावणीचा रंग आणि ढंग!

अण्णांची तशी अनेक रूपं होती. 'शाहीर अमर' या नावानं त्यांनी अनेक पोवाडे लिहिले. 'शाहीर वैश्वानर' या नावानं शब्दांच्या पलित्यांनी त्यांनी १९४२ साली मनामनात क्रांतीचं रान पेटवलं. कधीं 'बोन्या भगवान्' या नावानं त्यांनी अनेक खस्याळ कुरेंबाज लावण्याही लिहिल्या.

अशीच जन्मलेली ही एक लावणी. कै. शाहीर लहरी हैदर वगैरे मंडळींची मैफल रंगली होती. या जुन्या जाणत्या शाहिराला ते फार मान देत: लहरी हैदर हेही

जातिवंत शाहीर होते. ते सहज म्हणाले,

"माडगूळकर, 'ळ'च्या प्रासाची लावणी लिहिणं फार अवघड आहे नाही?" त्यावर माडगूळकर म्हणाले,

"त्यात अवघड काय आहे? अहो, 'ळ' शिवाय माझं पान हलत नाही. माझं आडनावच बघा की!"

"मग लिहिता का?"

"हो—" म्हणून माडगूळकर सिद्धासारखे बसले. कागद घेतला आणि या शीघ्र कवीनं फर्मास लावणीला जन्म दिला—

**तो :** तू हास पाखरा, हास
भोळं तुझं गं निळं डोळं
अन् कैक गडी त्वां केलं खुळं
तुझी नखरेल चाल
गोरं गुलाबी गाल
नाजुक त्यावरी काळा तीळ! ग ग ग

**ती :** पाऊल मागं घेरं
नको येऊ म्होरं
विषयाचं जरी तुला खूळ
पर मदनाचं हे हितं जाळं

**तो :** तू ग रिती पणती, तुझा उजेड किती
मी ग चांदवा तेजाळ! ग ग ग

**ती :** अरे, आहे माहित सारं, तुझं पडकं घर
छपरावरती की रं शेवाळ
अन् न्हाणींत फुटकं घंगाळं
सांगे बोऱ्या भगवान। ऐक शान्या तू ग्यान।
वाट इष्काची खडकाळ। जरी चुकून जाल।
तरी पुरे फसाल। जाळ नव्हं ह्यो जंजाळ।"

—हैदरसाहेबांनी लावणी ऐकली आणि या तेजाळ चांदव्याला त्यांनी कडकडून मिठी मारली.

खट्याळ लावणीची ही जशी आठवण, तशीच दुसरी एक प्रसन्न भूपाळीची. हा प्रसंग आहे प्रभातच्या 'संत जनाबाई' या चित्रपटाच्या वेळचा. या चित्रपटाची कथा—पटकथा—संवाद—गीतं सगळं श्रेय माडगूळकरांचंच. एकापेक्षा एक सरस अशी अनेक गीतं त्यांनी लिहिली होती; आणि सुधीर फडक्यांनी त्यांना चालीही

तितक्याच भक्तिभावानं भरलेल्या दिल्या होत्या. त्यांतील एका गाजलेल्या भूपाळीचीच ही कथा. त्या काळी चित्रपट लागण्यापूर्वी चित्रपटाचं बुकलेट तयार केलं जात असे. त्यांत कथानकाचा सारांश आणि गीतं असत. मी त्याप्रमाणं बुकलेट तयार केलं आणि व्यवस्थापकांच्याकडं दिलं. त्यांनी ते चाळलं आणि एकदम विचारलं,

"काय हो, हे काय ? 'प्रभात समयो पातला' या भूपाळीच्या खाली माडगूळकरांचं नाव ?"

"हो ती भूपाळी त्यांनी लिहिलीय, म्हणून त्यांचं नाव."

"काय थट्टा करताय काय ? अहो ही भूपाळी एखाद्या संतकवीची असली पाहिजे. चला आपण साहेबमामांनाच दाखवू—"

आमची वरात प्रभातचे मालक कै. एस. फत्तेलाल, म्हणजेच साहेबमामा यांच्याकडे गेली. साहेबमामा लोडाला टेकून बैठकीवर स्केच करीत बसले होते. कुणाशीही ते बोलत असले तरी त्यांचे हात चालूच असायचे. 'काय आहे ?' असं त्यांनी विचारल्यावर व्यवस्थापकांनी सर्व सांगितलं, साहेबमामांनी मला विचारलं. मी पुन्हा माडगूळकरांच्या बाजूनं साक्ष दिली. साहेबमामा म्हणाले, 'माडगूळकरांनाच बोलावू ना ! गाडी गेली. माडगूळकर आले. स्केच करता करता पुन्हा विचारणा.

"माडगूळकर, ही भूपाळी कुणाची ?"

"भूपाळी विठ्ठलाची. पण लिहिली आहे मी."

"पण वाटते संताची. ऐकवा बघू."

आणि माडगूळकरांनी संताच्या सात्त्विकतेनं वाचायला सुरुवात केली—

"प्रभात समयो पातला ।
आता जाग बा विठ्ठला ॥
दिठी दिठी लागली । तुझिया श्रीमुखकमलावरी
श्रवणि मुखी रंगली । तुझिया नामाची माधुरी
प्राणांची आरती । काकडा नयनी चेतविला ।
आता जाग बा विठ्ठला ॥"

ऐकताना साहेबमामांचं स्केच काढणं चालूच होतं. ते म्हणाले, 'पुन्हा वाचा' माडगूळकरांनी ती भूपाळी पुन्हा ऐकवली आणि त्यावर रसाळ भाष्य केलं. ते ऐकून त्या थोर कलावंताचे डोळे भरून आले; आणि ते म्हणाले,

"ही भूपाळी संतांचीच आहे—तुकारामबुवांची—"

"नाही साहेबमामा, ही माझीच आहे—'

"अहो, पण माझ्याकडं पुरावा आहे. हा पहा—"

असं म्हणून त्यांनी केलेलं स्केच माडगूळकरांच्या हातांत दिलं. ते स्केच कसलं

अनुक्रमणिका

होतं ठाऊक आहे? तुकारामाचा वेष चढविलेल्या माडगूळकरांचं. 'तुकारामबुवा माडगूळकर'! ते बघून माडगूळकरांनाही गहिवरून आलं. त्यांना जवळ घेत साहेबमामा म्हणाले,

'तुकाराम' चित्रपट केलेल्या माणसालाही तुम्ही आज फसवलंत—"

—अशी ती धन्य भूपाळी!

लेखनात जशी अण्णांची चतुरस्रता प्रगट झाली होती, तशी ती अभिनयातही झाली होती. 'बहिर्जी नाईक' मधील भिऱ्या शिपायापासून 'सौभाग्य' मधील अगतिक अपंगापर्यंतच्या नाना तऱ्हेच्या भूमिका त्यांनी यशस्वीपणे वठविल्या होत्या. 'पुढचं पाऊल' मधला देवनाक महार तर विसरणं शक्य नाही. पण माझ्या कायमची स्मरणात आहे, ती त्यांची 'जय मल्हार' चित्रपटातली छोटीशीच पण अत्यंत परिणामकारी अशी दाजी पाटलांची भूमिका. आपल्या जावयानं लेकीच्या उरावर सवत आणून तिच्या संसाराला चूड लावल्याचं कळल्यावर त्या बदफैली जावयाची कठोर कानउघाडणी करण्यासाठी दाजी पाटील येतात. जावयाची कडक हजेरी घेतात. पण व्यसनात गुंतला की माणूस आदराची नाती विसरतो. जावई सासऱ्याचा अपमान करतो; "वाटलं तर आपल्या लेकीला कायमची घेऊन जावा," म्हणून सांगतो. लेकही "तुम्ही जावा बाबा, मी जगायचं तर हितंच जगन आणि मरायचं तरी हितंच मरन' असं म्हणून त्यांनाच जायला सांगते. दाजी पाटलांचा नाईलाज होतो. लेकीसाठी काळीज तुटतं, पण काही करता येत नाही. अपमान सहन होत नाही. पण ते तो गिळतात, आणि जावयाला बजावतात.

"आरं, अशा नादानं कुणाचं बरं झालंय? चौदा चौकड्याचं रावणाचं राज्य, तेबी गेलं ह्या नादात, तिथं तुझी काय कथा?" दाजी पाटलांचं भाषण असं बोलून अण्णा ब्लॉकबाहेर गेले, दिग्दर्शकांचा शॉट संपला. पण अण्णांचा शॉट संपला नव्हता. कितीतरी वेळ खांबाचा आधार घेऊन ते तसेच थरथरत उभे होते; आणि भूमिका जिवंत जगलेल्या त्या अभिनेत्याकडं आम्ही अवाक् होऊन बघत होतो.

साहित्य आणि चित्रपट या क्षेत्रांतलं या 'गजानना'चं कर्तृत्व दिग्गजाचं आहे. पूर्वायुष्यात उलटी झालेली अंबारी त्यांनी केवळ आपल्या लेखन-कर्तृत्वावर सुलटी केली. उदंड धन आणि कीर्ती मिळविली. मुंबई-पुणे राजरस्त्यावरील 'पंचवटी'तला त्यांचा घरचा आणि कलेचा संसार सर्वांगांनी बहरला होता. त्यांचे हात खऱ्या अर्थानं आभाळाला टेकले होते. तरीपण पायाखालच्या मातीची त्यांची सोबत सुटली नव्हती की, जडलेली जिव्हाळ्याची नाती तुटली नव्हती. केव्हाही आणि कितीही दिवसांच्या अंतरानं भेटी झाल्या तरी दुरावा वाटायचा नाही की, ओलावा आटायचा नाही. उलट अभिजात उत्साही अगत्यानं ते स्वागत करायचे.

फार दिवसांनी मी अण्णांच्या समोर गेलो की 'पेटी स्वारीकी जय!' म्हणून ते

हमखास ओरडायचे. जवळच्या कुठल्याही माणसाला त्यांनी त्याच्या खऱ्या नावानं हाक मारल्याचं मला तरी आठवत नाही. अगदी वहिनींनासुद्धा ते ' मंदी ' म्हणूनच हाक मारायचे. निर्मळ थट्टा हा एक त्यांचा खास अंगभूत गुण होता. मूक राहून आणि मंद हसून त्यांच्या अशा थट्टेची टर उडवणे हा वहिनींचा छंद होता. एखाद्या वेड्याच्या वागण्याकडं लक्ष देऊ नये, तसं वहिनी करीत, आणि मग अण्णा म्हणत, " पाहिलंस ? हिला वाटतंय, वेडं आहे-बडबडतंय-लिहितंय ! " यावर मग वहिनीं आणि आम्ही सगळेच दिलखुलास हसत असू.

—पण गेल्या चार वर्षात असं हसू या घरातून हळूहळू मावळू लागलं होतं, इथल्या भरल्या सुखाला दृष्ट लागल्यासारखं झालं होतं.

चार वर्षापूर्वी दैवानं पहिला घास केला अण्णांच्या थोरल्या जावयाच्या ( कै. सुधाकर पारखे यांच्या अपमृत्यूचा. ) माडगूळकर व पारखे या दोन्ही कुटुंबांवर हा वज्राघातच होता. परशुरामभक्त बाबुराव पारखे यांनी जसा तो घाव झेलला, तसाच तो माडगूळकरांनीही झेलला. ' मरण कल्पनेशी थांबे तर्क जाणत्यांचा ' या स्वतः-च्याच शब्दांचा आधार घेत ते आसवांची नदी पापण्यांत गोठवीत पुन्हा उभे राहिले. पण दैवाला आपला हा पराजय सहन झाला नाही. त्यानं दुर्धर अशा कर्करोगाच्या साहाय्यानं दोन वर्षांपूर्वी प्रत्यक्ष अण्णांवरच हल्ला चढविला. या हल्ल्यालाही ते पुरून उरले. या चकमकीत ते एक फुप्फुस गमावून बसले. ' बचेंगे तो और भी लडेंगे ' या बाण्यानं पुन्हा लढत राहिले, जीवन जगत राहिले. पण अदृष्टांतला अनर्थ कुणाला टळलाय ? पुन्हा प्रलय ओढवला. जिला पोटच्या मुलीसारखी लहानाची मोठी केली, वाढविली, त्या धाकट्या बहिणीचे पती अवेळी अचानक गेलेले पाहण्याचं त्यांच्या कपाळी आलं. हे दुःख कमी होतं म्हणून की काय, प्रत्यक्ष ती बहीणही पतिवियोगानं गेल्याचं त्यांना भरल्या डोळ्यांनी पाहावं लागलं. माणसाच्या आपदा भोगण्यालाही काही सीमा असतात. आघातावर आघात झाले की माणूस एकाच गोष्टीचा विचार करू लागतो. ती गोष्ट म्हणजे आपण स्वतःहूनच काळाच्या मुखात जाण्याचा. एखाद्या जिव्हाळ्याच्या मित्राबद्दल बोलावं, तसं ते अलीकडं मृत्यूबद्दल बोलत असत.

परवाच्या दिवाळीतली गोष्ट. दरवर्षीच्या नियमाप्रमाणं मी त्यांच्याकडं गेलो होतो. नुकतंच लग्न झालेली लेक जावई दिवाळसणासाठी आली होती सोहळा थाटात पार पडला आणि आम्ही बाहेर व्हरांड्यात आलो. ते ' सिंहासना'वर बसले. मी समोर बसलो. वातावरण आनंदी बघून मी मुद्दामच म्हटलं,

" छान झाला सोहळा ! "

—यावर डोळे थोडेसे बारीक करून म्हणाले,

" होय. पण मी तो दूरच्या डोळ्यांनी पाहिला, हळूहळू मी आता दूर जातोय. "

पुन्हा मी संभाषणाची गाडी दुसरीकडं वळवायचा प्रयत्न केला, पण त्यांनी ती पुन्हा मूळपदावर आणलीच. एकदम त्यांनी विचारलं, " तुला दोनदा निरोप पाठविले होते, तरी पण आला नाहीस तू ? "

मी म्हटलं,

' आजारीपणामुळं येऊ शकलो नाही. नाहीतर निरोप मिळाल्यावर आलो नसतो का ? "

" ते खरं रे, पण निमंत्रणाशिवाय येणारा एकच मित्र आहे– "

यापुढं ते काय म्हणणार हे मी ओळखलं, आणि त्यांना अडवायचा प्रयत्न केला. पण तेवढ्यात ते बोललेच—

" निमंत्रणाविण आला मृत्यू
आला नाहिस बोलावुन तू ! "

ऐन दिवाळीच्या दिवशी त्यांच्या घरी गोड खाऊन मी बाहेर पडलो खरा, पण तोंडात कडू चव रेंगाळत राहिली, मनातली काजळी वाढतच गेली.

त्यानंतरची भेट म्हणजे वीस नोव्हेंबर १९७७, रविवार रोजी पुण्यास गरवारे महाविद्यालयाच्या प्रांगणांत भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या समयी झालेली. भाषा भगिनींच्या कार्यक्रमाचं संचालन करून अण्णा मोकळे झाले. मी त्यांना गाठलं आणि घाईघाईतच निरोप घेत म्हटलं,

" मी उद्या कोल्हापूरला जातोय. " यावर कै. बाबूराव पेंढारकर जे वाक्य एका चित्रपटात ज्या थाटात बोलत, त्या थाटात ते म्हणाले,

" जाताय तर जा, पण आम्हाला पोचवूनच जा—"

का कुणास ठाऊक, पण त्यातला ' पोचवूनच ' हा शब्द मला फार खटकला. पूर्वी हे वाक्य आणि हा शब्द अनेक वेळा ऐकला होता. पण या वेळी फार खटकला खरा. खट्टू मनानंच मी बाहेर पडलो आणि तीच त्यांची अखेरची भेट ठरली. त्यांचं अंत्यदर्शन घडणंसुद्धा माझ्या नशिबी नव्हतं.

परवा दर्शन घडलं ते ' राम ' निघून गेलेल्या त्या सुन्या ' पंचवटी'चं, आणि बाहेरच्या व्हरांड्यात पोरक्या होऊन पडलेल्या त्या ' सिंहासनाचं. ' तो शब्दप्रभू ज्या आसनावर बसत होता, त्याला ' सिंहासन ' नाही तर दुसरं काय म्हणणार ? त्या सिंहासनाला आणि शेजारी भिंतीवर लावलेल्या त्यांच्या तसबिरीला मी नमस्कार केला. तसबिरीवर ताज्या फुलांचा हार रुळत होता. खाली उदबत्त्या दरवळत होत्या. जणू त्यांनी मला विचारलं.

" किती उशीर केलास रे ! "

" मला उशीर झाला खरा; पण तुम्हाला जायची एवढी काय घाई झाली होती ? "

—खरंच, अण्णांनी जायची घाई केली, फार घाई केली! आता पंचवटीत राम राहिला नाही. वडील भावाच्या मायेनं पाठीवरून फिरणारा हात उरला नाही. आता त्यांना भेटायचं म्हणजे त्यांच्या शब्दांतूनच अशा या शब्दसृष्टीच्या ईश्वराला शब्दांशिवाय दुसरं काय वाहणार ?

" जसे येतसे फूल वेलीवरी
जसा श्रीहरी वाजवी बासरी
तसा येइ हृदयात घेऊन गाणे
असा सिद्ध कविराज आता न होणे!"

* * *

## साभार स्वीकार

संकीर्ण

कर्वे चिं. श्री. : चला अन्य ग्रहावर; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, रु. ६
साने गो. द. : सोवियेत शेती व शेतकरी; अभिनव प्रकाशन, मुंबई, रु. १०
भोसले म. भा.: कुमार गीता; विजय प्रकाशन, तासगाव. जि. सांगली रु. ७·५०
नारगोलकर वसंत : अखेर जयप्रकाशजीच खरे ठरले; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई रु. १२
तडवी शांतादेवी एच : कुराणदर्पण; शान्तादेवी एच. तडवी, जळगाव, रु. ३
शिंदे वा. पु.: चांगदेव पासष्टी : एक अभ्यास; किसनमहाराज साखरे, साधकाश्रम, आळंदी देवाची, जि. पुणे, रु. ६
वैद्य व. ल. : आरोग्यासाठी योगासने : मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई रु. ८·५०

## ३

# सामाजिक क्रांतीचे प्रणेते : महात्मा जोतिराव फुले

**रावसाहेब कसबे**

आधुनिक भारताच्या इतिहासाचे विश्लेषण करताना म. फुल्यांच्या कार्याची, दोन प्रमुख बाजूंनी विचार करण्याची एक पद्धती रूढ झालेली आहे. एका बाजूने म. फुल्यांनी ब्राह्मणेतर चळवळीला जन्म दिला; आणि पुढे ती चळवळ राजकीय सत्तेसाठी कडवी जातीयवादी कशी बनली, हे स्पष्ट करण्याचे प्रयत्न होतात, तर दुसऱ्या बाजूने फुल्यांना अनेक समाजसुधारकांतील एक समाजसुधारक मानून, फारच झाले तर त्यांना 'कर्ते समाजसुधारक' हे विशेषण उदार अंतःकरणाने बहाल करून मोकळे होण्याचे प्रयत्न होतात. या दोन्ही बाजूंनी विचार करताना म. फुले यांच्यावर व त्यांच्या समग्र चळवळीवर अन्याय झालेला आहे. एकोणिसाव्या शतकातील केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे, तर संपूर्ण भारताच्या सामाजिक चळवळींना क्रांतिकारी प्रेरणा देणारे म. फुले आणि त्यांची चळवळ यांना खरोखरच न्याय द्यावयाचा असेल तर इतिहासाच्या पार्श्वभूमीवरच त्यांचे कार्य तपासले पाहिजे.



म. फुल्यांच्या समकालीन ज्या चळवळी फोफावल्या होत्या, त्या हिंदू धर्माच्या प्रमुख मूल्यांच्या विरोधी नव्हत्या. हिंदू धर्मातील या पारंपरिक मूल्यसंकल्पनांच्या आधारेच भारतीय समाजातील बहुजनसमाजाला शतकानुशतके अंधश्रद्धा अज्ञान आणि दारिद्र्य यांत सतत डांबून ठेवण्यात व आपले वर्गवर्चस्व टिकविण्यात हिंदू पुरोहित वर्गाला यश आलेले होते. हे सर्व जाणीवपूर्वक व नियोजनबद्ध होत होते. याचा भारतात फुले यांच्या काळात जन्मलेल्या कोणत्याही पुनरुज्जीवनवादी व सुधा-

रणावादी चळवळीला विचार करण्यात रस नव्हता. म. फुल्यांनी याचा विचार अतिशय खोलवर केला व त्या विरोधी चळवळ उभारली. समाज-सुधारकांच्या चळवळीचा आधारच हिंदुधर्मशास्त्र आणि संतवाङ्मय हा होता. तरीही त्यांना समाजसुधारणेची इच्छा होती. यासाठी सुधारकांनी त्याच त्या हिंदू पारंपरिक जुन्या मूल्यांचे नवीन विश्लेषण ( interpretation ) करावयाचे ठरविले. फारच झाले तर त्या जुन्याच मूल्यांचे नवीन अर्थ सांगावयाचे ठरविले. याउलट म. जोतीराव फुल्यांचा या जुन्या मूल्यांनाच विरोध होता. या मूल्यांची पाळेमुळेच त्यांना जनमानसातून उपटून काढून फेकून द्यावयाची होती. म. फुलांच्यापेक्षा सुधारकांचे काम सोपे होते. फुल्यांचे काम कठीण होते, मूलभूत परिवर्तनाचे होते, म्हणून फुल्यांना विरोध झाला. फुले खूप काळ उपेक्षित राहिले. या मूल्यभेदाची कल्पना आल्याशिवाय म. फुल्यांच्या कार्याच्या क्रांतिकारी रूपाचे दर्शन होणे असंभवनीय आहे.

वास्तविक पाहाता आपण जी नैतिक मूल्ये ( values ) स्वीकारतो किंवा ज्या नैतिक संकल्पना ( concepts ) स्वीकारतो, त्या संकल्पनांचा अर्थ समाज बदलला तरी स्थिर राहातो. तो बदलत नाही, जे बदलते ते केवळ उपयोजन ( applicati: n ) की त्या संकल्पनाच बदलतात ? यासंबंधी तत्त्वज्ञानाच्या शाखेत जागतिक पातळीवर सतत वाद चालू आहेत. या ठिकाणी त्या वादात शिरण्याचे कोणतेही प्रयोजन नाही. आपण जेव्हा सामाजिक मूल्यांचा समाजाच्या गतिशीलतेच्या संदर्भात विचार करतो, तेव्हा एखाद्या समाजाने अथवा राष्ट्राने, जी मूल्ये स्वीकारलेली असतात व जी परंपरेने चालत आलेली असतात, त्यांच्यामुळे समाज स्थितिशील बनतो आहे, विघटित होतो आहे, स्वत्व हरवून बसलेला स्पष्ट दिसतो आहे, तरी त्या मूल्यांचे आग्रही प्रतिपादन योग्य आहे काय, याचा विचार कोणी करीत नसतो. ही मूल्ये वर्गीय शोषणाला मान्यता देणारी असतात. म्हणून ती वरच्या वर्गांना हवी असतात. यासाठी रुढिप्रियतेचा आव आणणे किंवा ती खूप जुनी आहेत म्हणून श्रेष्ठ आहेत असे परंपरावादी मनांना सांगून त्यांची सहानुभूती प्राप्त करणे, किंवा फार काय तर, 'रामायण-महाभारतकालीन माणूस आणि आजचा माणूस एकच आहे तो बदलला कुठे ?' यासारखे शब्द-पांडित्य दाखविणे या सर्व गोष्टी डावपेचाचे ( strategy ) भाग असतात. जुनी मूल्ये उदात्त असतात, ती सनातन असतात, त्यांच्यावर लोकांची भक्ती असते, म्हणून ती परंपरावाद्यांना हवी असतात असे नाही, तर जुने शोषण पुढे अव्याहत चालू ठेवण्याचे ते एक हत्यार असते, म्हणून त्यांचे आग्रही प्रतिपादन होते. या सर्व प्रचाराची आणि दांभिक वृत्तीची पर्वा न करता जेव्हा महापुरुष या मूल्यांच्या योग्यतेलाच आव्हान देतात तेव्हा धर्मपीठे हादरतात. म. फुल्यांच्या 'गुलामगिरी' या ग्रंथाने ते आव्हान दिले. म. फुले सुरुवातीला प्राणपणाने एकाकी लढले. म. फुल्यांची ही लढाई समग्र परिवर्तन करणारी आणि सम्यक क्रांतीची प्रेरणा देणारी होती. म्हणून म. फुले यांचे

अनुक्रमणिका

रूपच क्रांतिवीराचे होते. क्रांती आणि सुधारणा या दोन शब्दांचा अर्थच ज्यांना समजणे कठीण असते ते फुल्यांना केवळ 'कर्ते सुधारक' म्हणतात. सुधारणावादी चळवळी तडजोड करणाऱ्या आणि प्रस्थपितांचे हितसंबंध जपणाऱ्या असतात, म्हणून अनेकदा त्या क्रांतिविरोधीही असतात.

समाजात हे क्रांतिकारी परिवर्तन करण्याच्या दृष्टीने म. फुल्यांचा 'गुलामगिरी' हा ग्रंथ मला अतिशय मोलाचा वाटतो. बहुजनसमाजाच्या दाहक अपमानाच्या आणि जीवघेण्या सामाजिक आणि आर्थिक दुःखांच्या हुंकारातून जन्मलेला पहिला नकार आणि विद्रोह म. फुल्यांनी 'गुलामगिरी' या ग्रंथाच्या रूपाने शब्दबद्ध केला. फुला-फळांचा, निसर्ग–सौंदर्याचा, कोमल प्रतिभेचा हव्यास आणि भाषेच्या शुद्धतेचा दर्प असलेल्या मराठी वाङ्मयाला म. फुल्यांनी आपल्या बहुजनांच्या रांगड्या भाषेत व्यक्त केलेले निखारे पेलण्याचे सामर्थ्य नव्हते. म्हणून फुले 'साहित्य-सम्राट' किंवा 'मराठी भाषेचे शिवाजी' म्हणून मान्यता पात्र शकले नाहीत. फुल्यांना आणि बहुजनसमाजाला त्या उसन्या विशेषणांची गरजही वाटली नाही. मराठी वाङ्मयात म. फुल्यांनी एका नव्या युगाचा पाया घातला. ते युग त्यांनी स्वतः निर्माण केले. म्हणून म. फुले भारतवर्षातील जसे सामाजिक क्रांतीचे प्रणेते आहेत, तसेच ते मराठी वाङ्मयाला 'नव्या जाणिवा' व 'नव्या प्रेरणा' देणारे युगकर्तेही आहेत. म. फुले यांचा 'गुलामगिरी' हा ग्रंथ अनेकांना विध्वंसक वाटला. मी स्वतःही त्याचे विध्वंसक स्वरूप मान्य करतो. परंतु ज्या पारंपरिक सामाजिक मूल्यांना नकार देऊन फुले त्यांचा विध्वंस करू पाहात होते, त्याचबरोबर त्याऐवजी नवीन मूल्यांचीही समाजात प्रतिष्ठापना करण्याचे काम शिरावर घेत होते. जुने नाकारायचे काय, आणि नवे स्वीकारायचे काय, याची स्वच्छ आणि स्पष्ट जाणीव त्यांच्या लिखाणात दिसते. कोणती नवी मूल्ये स्वीकारायची हे त्यांनी आपल्या 'सार्वजनिक सत्यधर्मा'त स्पष्ट केले आहे. सार्वजनिक सत्यधर्माची स्थापना करू इच्छिणारे म. फुले समजावून घेतल्याशिवाय 'गुलामगिरी'-तील नकाराचे व विध्वंसाचे आकलन होणार नाही. 'गुलामगिरी' आणि 'सार्वजनिक सत्यधर्म' हे ग्रंथ म. फुल्यांच्या विचारांचे दोन महत्त्वाचे पैलू आहेत. त्यांचा सुटा विचार होणार नाही. तो एकत्रच करावा लागेल. यापुढे जाऊनही असे म्हणता येईल की, या दोन महत्त्वपूर्ण चळवळी होत्या. या दोन चळवळी एकमेकावर इतक्या अवलंबून होत्या की, एक यशस्वी झाल्याशिवाय दुसरी यशस्वी होण्याची सुतराम शक्यता नव्हती. या ठिकाणीसुद्धा म. फुले आणि इतर सुधारक यांच्या विचारांतील आणि कार्यातील फरक लक्षात यायला हरकत नसावी. जुनी मूल्ये नाकारून व नवीन मूल्यांचा स्वीकार करुन केलेली सामाजिक चळवळ व जुन्याच मूल्यांना तत्कालीन रूढ अर्थाच्या विरोधी अर्थ देऊन (असे केले तरी जुन्या मूल्यांचा मूळ अर्थच बदलतो. म्हणजेच एका अर्थाने ती नवीनच व्हायला हवीत), केलेल्या सामाजिक चळवळी,

या दोन्हीही चळवळींच्या मुळाशी जुन्या मूल्यांना व व्यवस्थेला नकार देण्याची प्रवृत्ती अटळ असते. त्याशिवाय सुधारणा शक्यच नसते. पण सुधारकांच्या हे लक्षात न आल्याने त्यांना जुन्या मूल्यांनासुद्धा नवीन अर्थ देण्यात अपयश आले. समाज-व्यवस्थेच्या परिवर्तनाचे म. फुल्यांचे चिंतन या दृष्टीने निश्चित मूलग्राही मानले पाहिजे. म. फुल्यांच्यापासून प्रेरणा घेऊन, त्यांना गुरुस्थानी मानून डॉ. बाबासाहेब आंबेड-करांनीसुद्धा हाच विचार अधिक शास्त्रीय पद्धतीने विसाव्या शतकात मांडला. म. फुल्यांच्या ' गुलामगिरी ' आणि ' सार्वजनिक सत्यधर्म ' या दोन ग्रंथात जे सूत्र आहे, तेच सूत्र आंबेडकरांच्या ' Annihilation of caste ' आणि ' Buddha and His Dhamma ' या दोन ग्रंथांत आहे. म. फुले आणि डॉ. आंबेडकर या जवळ-जवळ पाऊण शतकाचे अंतर असणाऱ्या दोन गुरु-शिष्यांतील साम्य म्हणजे सामाजिक क्रांतीच्या विचारातील आणि डावपेचातील महत्त्वपूर्ण विकास होय.

' गुलामगिरी हे पुस्तक म्हणजे जोतिरावांनी सुरू केलेल्या विषमतेविरोधी आंदो-लनाची नांदी होती. या पुस्तकातील पहिल्या नऊ प्रकरणांत ब्राह्मणी वर्चस्वाचा इतिहास आहे. याच पुस्तकातील दहा ते सोळा या प्रकरणांत प्रामुख्याने ब्राह्मणी धर्माची फजिती आणि पश्चिमात्य इतिहासकारांनी या धर्मातील उघडकीस आणलेला दांभिक-पणा आहे. या पुस्तकाची सुरुवातच ' The day that reduces a man to slavery takes from him the half of his virtue ' या प्रसिद्ध कवी होमर यांच्या वचनाने झालेली आहे. हिंदुस्थानचा इतिहास हा या देशातील बहुसंख्यांक समाजावर लादलेल्या गुलामगिरीचा इतिहास असल्याने या देशातल्या सामान्य माणसाला देशाच्या इतिहासात जेवढे दारिद्र्य, दैन्य, मानहानी आणि पारतंत्र्य आले तेवढे क्वचितच एखाद्या देशाच्या वाट्याला आलेले असेल. ही गुलामगिरी धर्मदास्या-तून निर्माण झालेली आहे, म्हणून हे धर्मदास्य झुगारून सामान्य माणूस मुक्त केला पाहिजे. जोतिरावांच्या अंतरीच्या या इच्छेचे प्रतिबिंब त्यांच्या ग्रंथांत पडलेले स्पष्ट जाणवते.

आपण अलीकडे जेव्हा बंड, क्रांती, आंदोलन इ. शब्द वापरतो त्यावेळी ते कोणत्या तरी व्यक्तिसमूहाविरुद्ध असतात असे आपण गृहीत धरीत असतो. अनेक वेळा व्यक्ती-विरुद्ध किंवा व्यक्तिसमूहाविरुद्ध पुकारलेले बंड अथवा केलेली क्रांती ही न्याय्य असतेच असे नाही, परंतु क्वचित प्रसंगी तिची आवश्यकताही मान्य करावी लागते. म. जोतीराव फुल्यांचे बंड हे कोणा व्यक्तीविरुद्ध किंवा व्यक्तिसमूहाविरुद्ध होते असे मानता येत नाही. म. फुल्यांचे बंड त्या काळात समाजात अस्तित्वात असणाऱ्या व समाजात विषमता निर्माण करणाऱ्या सामाजिक मूल्यांविरुद्ध होते. ' गुलामगिरी ' या ग्रंथाची अर्पणपत्रिका याच्या साक्षीला आहे. म. फुल्यांनी हा ग्रंथ अमेरिकेतील अशा सदाचारी लोकांना अर्पण केलेला आहे की, ज्यांनी गुलामास दास्यातून मुक्त

अनुक्रमणिका

करण्याच्या कामात औदार्य, निरपेक्षता आणि परोपकार बुद्धी दाखविलेली होती. याचा सरळ अर्थ असा की, जे कोणी विषमता निर्माण करणाऱ्या या मूल्यविरोधी चळवळीत सामील होतील, त्यांच्यात आपपरभाव न मानता ही मुक्तीची चळवळ पुढे नेली पाहिजे. भारतातील विसाव्या शतकातल्या पुरोगामी चळवळींना म. फुल्यांनी दिलेली ही अतिशय महत्त्वाची प्रेरणा आहे. परंतु याकडे पुरोगामी म्हणविणाऱ्या चळवळींनी अद्याप लक्ष दिले नाही. म्हणूनच ही पुरोगामी चळवळ अधिक विघटित आहे. म्हणून ही चळवळ व्यापक पायावर उभी राहू शकत नाही. म. फुल्यांच्या विचारांना आणि चळवळीला आधुनिक भारताच्या इतिहास-मीमांसेत महत्त्वपूर्ण स्थान दिल्याशिवाय ही इतिहास-मीमांसा वस्तुनिष्ठ होणार नाही. भारतीय इतिहासकारांची या दृष्टीने असणारी उदासीनता अस्वस्थ करणारी आहे.

अलीकडे आपल्या राजकीय, सामाजिक आणि आर्थिक जीवनात अतिशय गुंतागुंत निर्माण झालेली आहे. ती कमी होण्याऐवजी दिवसेंदिवस वाढतच आहे. विसाव्या शतकातील सामाजिक आणि राजकीय चळवळीचा कालखंड, हा कोणत्याही महापुरुषाच्या प्रेरणांचा आपापल्या सोईने अर्थ लावून, सत्ता आणि संपत्ती यांच्यासाठी एक साधन म्हणून वापरण्याचा कालखंड ठरत आहे. त्यासंबंधी इथे अधिक काय लिहावे ?

* * *

## साभार स्वीकार

### कथा

कोलारकर राम :( संपादन ) : वि. स. खांडेकर–निवडक कथा, भा. १, किशोर कोलारकर, संत तुकारामनगर, पिंपरी, पुणे १८; रु. १.

कोलारकर राम : ( संपादन ) आचार्य अत्रे–निवडक कथा. भा. १, किशोर कोलारकर, संत तुकारामनगर, पिंपरी, पुणे १८, रु. १.

कोलारकर राम : ( संपादन ) ना. सी. फडके–निवडक कथा, भा. १, किशोर कोलारकर, संत तुकारामनगर, पिंपरी, पुणे १८; रु. १.

मुलाटे वासुदेव : व्यथाकुल, साहित्यरुचि प्रकाशन, बीड, रु. १०

घवी रवींद्र :( संपा ) स्वातंत्र्योत्तर गोमंतकीय मराठी कथा, गोमंतक साहित्य-सेवक मंडळ, पणजी, रु. ८.

थत्ते सुरेश हरि : सृजन, अपर्णा प्रकाशन, मुंबई, रु. ८.

# ४

## रविकिरणकवींच्या सहचारिणी

### मोहन ज्ञानेश्वर शहाणे

मराठी साहित्य मंडळात ‘रविकिरणमंडळ’ हा एक चमत्कार आहे. या मंडळाला घटना नाही, याचा कोणी अध्यक्ष नाही की कार्यवाह नाही, तरीही त्याला अस्तित्व आहे. मंडळ जन्मले ते सहज वेलीवर फूल उमलावे तसे. तसेच ते सुगंध देत राहिले. कालांतराने या फुलाच्या काही पाकळ्या गळाल्या, ते थोडे सुकले; त्याचा सुगंधही कमजोर झाला. तरीही कौतुक करावे असा जीवनरस त्यातून अजून वाहतो आहे. वाचकांस तो आनंद देतच आहे.—पण ‘रविकिरण’ हा एक चमत्कार आहे, असे मी म्हणतो, याचे कारण निराळे आहे. या मंडळाचे सदस्य साहित्यिक आहेत, नव्हे, साहित्य हीच या मंडळाची प्रेरणा आहे. शिवाय ते पुण्यातील आहे. पुणेकरांचेच आहे. तीन साहित्यिक एकत्र आले आणि तेही पुण्यात, म्हणजे काय होते, याचा अनुभव आपणास नाही काय ! त्यातून फक्त तीन निरनिराळ्या साहित्यसंस्था स्थापन होतात ! तसे या सात साहित्यिकांच्या बाबतीत झाले नाही. म्हणूनच मी म्हणतो की, रविकिरण मंडळाची दीर्घ स्थिरता हा एक चमत्कार आहे. या चमत्काराचा चमत्कारिकपणा हा की, या मंडळाच्या सदस्यांना मराठी साहित्यातील बहुतेक मानसन्मान कधी ना कधी मिळाले. याचे चार सदस्य साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले. त्यांना इतरही मान-सन्मान भरपूर मिळाले आहेत. मानवी स्वभावाच्या स्खलनशीलतेचा विचार करता याबद्दल या लोकांनी एकमेकांची असूया केल्याचे आढळत नाही. परस्परांच्या सन्मानात सर्वांनीच आनंद मानला. त्याला अमुक मिळाले, मला का नाही, किंवा मला उशिरा का, असा विचार कोणी केला नाही. रविकिरणमंडळ तसे मित्रमंडळच होते.

या मंडळाचे सदस्य निरनिराळ्या आर्थिक व शैक्षणिक स्तरांतील आहेत. पण बहुतेकजण मध्यम वर्गातीलच आहेत असे म्हणायला हरकत नाही. सर्वांनाच पूर्वायुष्यात काही ना काही कष्ट काढावे लागले आहेत. गिरीशांच्या व यशवंतांच्या कौटुंबिक जबाबदाऱ्या, घाट्यांच्या पितामहांचे उत्तर आयुष्यातील कष्ट यांचे येथे स्मरण होते. माधव ज्यूलियनांच्या उग्र अनुभवांचे चर्वितचर्वण अद्याप थांबलेले नाही; आणि माडखोलकरांवर गांधीवधानंतर आलेला प्रसंग आठवला की, अद्याप अंगावर शहारे येतात ( प्रस्तुत लेखक त्याला साक्षी होता ). या सहानुभवाने असेल, किंवा ही सर्व

मंडळी खऱ्या अर्थाने ‘ संस्कृत ’ होती म्हणून असेल, साहित्यिकांना सतत छळणाऱ्या असूयेपासून ही मंडळी बहुतांश दूर राहिली. अर्थात त्यांच्यात मतभेद वा वाद झाले नाहीत असे नाही. पण ते अतिरेकास गेले नाहीत. आपसात रुसवा किंवा अबोला निर्माण झालेला मला माहीत आहे, पण त्याचा अतिरेक झाला नाही, हे खरे.

या रम्य चित्रास दृष्ट लागू नये म्हणून की काय, पटवर्धन–माडखोलकर-वादाचे अपवादात्मक गालबोट मंडळास लागले आहे. माधवराव पटवर्धन व गजाननराव माडखोलकर हे दोघेही जिद्दी व स्वमताबद्दल आग्रही. दोघांजवळही शब्दसंपत्ती भरपूर, तेव्हा या वादास अनिष्ट वळण लागून त्यांनी ती शब्दसंपत्ती वाचकांच्या कोर्टात बारे-माप उधळून टाकली.

मला वाटते की, इतर सदस्यांप्रमाणे माडखोलकर जर पुण्यात किंवा पुण्याच्या आसपास राहात असते, तर तो वाद इतका विकोपास गेला नसता. नागपूर-कोल्हापूर-हून कागदी घोडे स्वारीवर निघाले नि प्रकरण दौडत गेले.

मी असे म्हणतो, याचे कारण रविकिरणमंडळाच्या स्थिरतेस कारणीभूत झालेल्या मंडळसदस्यांच्या गृहिणी होत. येथे त्यांचा निर्देश करणे आवश्यक आहे. रविकिरण मंडळ इतकी वर्षे साहित्यात भर टाकीत आहे व आपापसांतील सलोखा राखून आहे, याचे प्रमुख कारण त्यांचा कौटुंबिक स्नेह होय. त्यात सर्वांच्या सहचारिणींचा मोठा वाटा आहे. तसाच त्यांच्या स्वाभाविक, सौजन्यपूर्ण आतिथ्यशीलतेचाही आहे.

माधव जूलियन यांनी “ देवा, स्त्रीहृदयी मनोरमपणा कोणी कधी ओतला ? ” हा आर्त प्रश्न विचारला, तेव्हाच एक प्रार्थनाही केली : “ देवा, ठेव गरीब आणि नलगे कीर्ति, परी दे मला । अंगी थोर सहिष्णुता, रसिकता ऐशी कुणी प्रेमला । ”

या मंडळींची तपश्चर्या मोठी म्हणा की, पूर्वपुण्याई जबरदस्त म्हणा, पण देवाने त्यांची प्रार्थना ऐकून ‘ तथास्तु ’ म्हटले असावे. ‘ कीर्ति नलगे ’ म्हटले तरी ती मिळाल्यास कोणी धिक्कारीत नाही, हे आपणांस कळते तर देवास कळत नाही, असे कसे म्हणावे ! तेव्हा तीही त्याने दिली. तक्रारीला जागा ठेवली नाही.

पण कल्पना करा की, या कवि-लेखकांच्या कौटुंबिक जीवनात सहिष्णू सहचारिणी नसत्या तर काव्य कितपत फुलले नसते, किंवा फुलून टिकले असते ?

“ पथि चालता पडती तुझी किती संथ कोमल पाऊले
जन मागुनी पुढुनी तुला मुरडून पाहत राहिले । ”

या पंक्ती वाचून ( अर्थात् प्रसिद्ध झाल्यावर, कारण स्वपत्नीस आपल्या स्त्रीविषयक कविता वाचून दाखवणारा कवी विरळा ) जर कविपत्नी पतीला ‘ ही कोण मन-हारिणी ? ’ म्हणून छेडू लागली किंवा ‘ स्थानभ्रष्ट फुलास ’ पाहून, ‘ ही कोण सैल अंबाड्याची टवळी ? ’ म्हणून क्रोधागारात जाऊन बसू लागली, वा , ‘ कंचनी ’ पाहून

'कोणत्या माडीवर गेला होता ?' म्हणून विचारू लागली, म्हणजे काव्य आटोपलेच.

—आणि मला वाटते, अशी संशय-पिशाचाची बाधा झाली तर त्यात वावगेही काही नाही. कारण 'तुमची कविता मला फार आवडली,' यापुढे 'तुम्ही मला फार फार आवडता' हा टप्पा फार दूर नाही याचा अनुभव साहित्यिकांना-विशेषतः कवींना-नवा नाही. तेव्हा रविकिरणमंडळाच्या सहिष्णू सहचारिणींना कृतज्ञतेची अंजली वाहणे योग्य होईल.

ही सहिष्णुता केवळ भावनांच्या बाबतीतच नव्हती. या लोकांच्या घरच्यांना दुसरा एक मोठा ताप सहन करावा लागत असे, अद्यापही लागतो, ही वस्तुस्थिती आहे. तो ताप म्हणजे घरी सतत सुरू असलेली लोकांची वर्दळ होय. 'वर्दळ' हा शब्द मी बुद्धया वापरला आहे. 'ते हवेत माझे मला—सखे, परि भवति सदा गलबला' ही यशवंतांच्या एका कवितेतील गृहिणीची गोड तक्रार अर्थपूर्ण आहे. यशवंत, गिरीश, रानडे, घाटे व (नागपुरास) माडखोलकर यांच्याकडे चाहत्यांची, मित्रांची, शिष्यवरांची, रसिकांची किती ये जा असे, याची कल्पना फ्लॅटमधील 'ममी-डॅडी-जीवन' काढणाऱ्या आजच्या मंडळींना येणे कठीण. या वर्दळीत माझ्यासारखे थेट स्वयंपाकघरात जाऊन, 'माई, आज तुमच्या हातची भाकरी हवी' असे म्हणणारेही असत. पण गेल्या चाळीस वर्षांत माझ्या अनुभवात या साध्वींच्या चेहऱ्यावर एकदाही कंटाळा दिसून आला नाही. चहा, फराळ आणि जेवण यांची साखळी सुरूच असे. यशवंतांचे बिऱ्हाड येरवड्यास दूर होते, तरी हाच प्रकार. नव्हे, दूर असल्याने भेटीस येणारे जेवायलाच येण्याचा संभव जास्त. गिरीशांच्या तेव्हाच्या शनवारातील घरात तर सतत लंगर सुरू असावा. तरुण साहित्यिकांची तेथे पंढरीयात्रा नेहमी आढळे. जावे, वाचावे, ऐकावे, खावे, गावे व प्रसन्न अंतःकरणाने परतावे.

"संसार तुझा वटवृक्षा ऐसा" हे यशवंतांचे उद्गार किती सार्थ आहेत याचे प्रत्यंतर गिरीशांचे घर. रानडे, घाटे यांच्याकडेही असेच प्रसन्न स्वागत होत असे. तसेच गिरीशांच्या माई, यशवंतांच्या नीराताई आणि नाना रानड्यांच्या नानी त्याच आतिथ्यशील मनमोकळेपणाने स्वागत करत असत. कै. मनोरमाबाई होत्या, तेव्हा तर रविकिरण मंडळाच्या सुहृदास रानड्यांच्या घरी चहापोह्यांबरोबर काव्यशास्त्रविनोदाचीही मेजवानी मिळत असे, कै. शांताबाई माडखोलकरांच्या मृदू शीतल पण तितक्याच प्रेमळ अतिथ्याचा अनुभव अनेक साहित्यिकांना आला आहे. ते नागपुरी आतिथ्य आगळेच असे. या मंडळींचे भाग्य असे की, चाळीस वर्षांनंतर यांच्या सुनानातवंडेही आता वृद्ध व गलितकार्य झालेल्या वडीलधाऱ्यांचे स्वागत तितक्याच आपुलकीने करतात. नाहीतर कोणीही भेटायला आल्यास "आज सुरेख बाजरीची भाकरी व वांग्याचे भरीत किंवा 'कालवण' केले आहे, थांबा जेवायला" असा आग्रह करण्याची सासऱ्याची काय हिंमत आहे ?

नुसता वेळाचा किंवा कष्टाचाच प्रश्न नाही. आपल्यासमोर आज देवासारखे बसलेले हे कविमंडळ कधीकधी रुद्ररूपही धारण करीत असणारच. यांचे हे सार्वजनिक सात्त्विक हसतमुख घरच्याना रुद्रमुख होऊन पाहायला मिळत नसेल असे कसे म्हणावे ? कै. लीलाबाई पटवर्धनांनी माधवरावांच्या 'वेताळा'चे वर्णन केले आहे. पण थोड्या बहुत प्रमाणात हा वेताळ पुरुष – प्रकृतीच आहे, मग संवेदनक्षम कवींत तो अधिकच असल्यास नवल काय ?

लक्षात घेण्याजोगी गोष्ट ही की, यांपैकी एकासही कोणी जहागीर दिलेली नव्हती. बहुतेक त्यावेळी आपापल्या संसाराची घडी व्यवस्थित बसविण्याच्या विवंचनेतच होते. तरीही या साध्वींची द्रौपदीची थाळी कधी रिकामी झाली नाही. तेव्हा घरगुती अडचणी व रागलोभ यांना तोंड देऊन सदैव प्रसन्नमुख राहणाऱ्या या कवींच्या सहचारिणींना व कुटुंबियांनाही त्यांच्या यशाच्या श्रेयाचा काही भाग देणे योग्यच ठरेल. त्यांच्या चमत्कारात त्यांच्या धर्मपत्नींच्या जादूचा मोठा वाटा आहे, कारण या मंडळींत कौटुंबिक जिव्हाळा निर्माण करून तो टिकविण्याचे कार्य या गृहिणींनी केले. त्या जर संशयी, खुरसटलेल्या, आळशी, कद्रू असत्या तर मंडळ केव्हाच मोडून पडले असते.

या चमत्काराची आणखी एक बाजू आहे. यशवंत, गिरीश, माडखोलकर व घाटे यांच्या रक्तातील साहित्यप्रेरणा पुढच्या पिढीतही उतरलेल्या व बहरलेल्या आढळतात. वसंत कानेटकर, अनुराधा पोतदार, मीनाक्षी फडणीस, चंद्रशेखर माडखोलकर माधुरी पारसनीस, यशोधरा पोतदार, प्रियदर्शन पोतदार यांच्यामधून हा गंगौघ पुढे सरकतो आहे. केवळ योगायोगाने पन्नास वर्षांपूर्वी एकत्र आलेली ही मंडळी महाराष्ट्र सारस्वतास वरदान ठरली. काव्य, कथा, कादंबऱ्या, ललितगद्य, बालसाहित्य, समीक्षणे, चरित्र, चर्चा, भाषाविमर्श, छंदविचार अशा साहित्याच्या सर्व दालनांत यांनी आपल्या पाऊलखुणा ठेवल्या आहेत. कुणीही हेवा करावे असे हे कर्तृत्व आहे.

* * *



अनुक्रमणिका

# ५

## वर्णक्रमी : एक पुनर्विचार

### शरद केशव साठे

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंक क्र. २०२ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९७७-) मध्ये डॉ. अशोक रामचंद्र केळकर यांचा 'मराठी देवनागरी वर्णक्रमी' ह्या विषयावरील लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यास अनुलक्षून पुढील विचार मांडले आहेत.

डॉ. केळकरांनी स्वीकारलेली वर्णमालेची व्यवस्था पुढीलप्रमाणे आहे :

(१) अ ते औ स्वर
(२) शिरोबिंदू व विसर्ग.
(३) क ते ज्ञ व्यंजने.

इथे "औ आणि क् ह्यांच्यामधली चिन्हे शिरोबिंदू आणि विसर्ग अशी आहेत" असे डॉ. केळकर प्रतिपादन करतात. ते बरोबर वाटत नाही. कारण ही दोन्ही चिन्हे बाराखडीतील "औ"कारापर्यंतच्या सर्वच रूपांना लागू शकतात. कसे ते पाहू :

शब्दामध्ये येणारी अक्षरे ही एकतर स्वर तरी असतात; किंवा स्वरयुक्त व्यंजने तरी असतात. (जोडाक्षरांचा विचार स्वतंत्रपणे करता येईल.) त्या स्वरांना किंवा स्वरयुक्त व्यंजनांना शिरोबिंदू व विसर्ग ही चिन्हे लागत असतात. म्हणजेच,

(१) स्वर,
(२) स्वर + शिरोबिंदू,
(३) स्वर + विसर्ग,
(४) व्यंजन + स्वर,
(५) व्यंजन + स्वर + शिरोबिंदू ; व
(६) व्यंजन + स्वर + विसर्ग

असा क्रम ठरतो. तो पुढीलप्रमाणे मांडूनही दाखविता येईल :

अ अं अः
आ आं आः
...........
...........

अनुक्रमणिका

औ औं औः
क कं कः
का कां काः इत्यादी.

एकदा हा क्रम निश्चित झाल्यावर वर्णक्रमी रचण्याचे काम सोपे होईल.

**( २ ) 'ॲ' आणि 'ऑ' बाबत :**

कलम १ मध्ये डॉ. केळकर 'ॲ' ला 'ए' नंतर आणि 'ऑ' ला 'ओ' तर स्थान देतात. त्याचे समर्थन तिसऱ्या कलमामध्ये करताना ते म्हणतात, "'ॲ' आणि 'ऑ' ह्या अनुक्रमे 'ए' आणि 'ओ' च्याच अधिक विवृत्त ( जबडा अधिक वासून उच्चारलेल्या ) आवृत्त्या आहेत." उच्चारदृष्ट्या हे जरी खरे असले, तरी 'अ' आणि 'आ' यांवर अर्धचंद्र दाखवूनच 'ॲ' आणि 'ऑ' यांचे लेखन होते. तेव्हा वर्णक्रमी रचताना 'अ' नंतर 'ॲ' आणि आ नंतर 'ऑ' घेणे सयुक्तिक ठरेल. नाहीतरी वर्णक्रमी रचताना "लेखनाचे भान ठेवणे पुरेसे ठरावे," असे डॉ. केळकर चौथ्या कलमाच्या शेवटच्या परिच्छेदात म्हणतातच.

**( ३ ) 'ळ', 'क्ष' आणि 'ज्ञ' बाबत :**

मराठी वर्णमालेच्या रूढ प्रथेप्रमाणे ह्यांची स्थाने अबाधित ठेवावीत, या डॉ. केळकरांच्या प्रतिपादनाशी मी सहमत आहे.

( ४ ) म्हणजे, आता, वरील १, २, ३ चा एकत्र विचार करता वर्णमाला अशी ठरेल :

( १ ) अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ
हे पारंपरिक स्वर,

( २ ) त्या स्वरांची अर्धचंद्र ( फक्त 'अ' आणि 'आ' बाबत ), शिरोबिंदू व विसर्ग ह्या प्रत्येकासहित ह्याच क्रमाने रूपे, आणि

( ३ ) क् ख् ग् घ.........ह् ळ् क्ष् ज्ञ्—
ही पारंपरिक व्यंजने

**( ५ ) जोडाक्षरांबाबत**

पूर्ण अक्षर संपल्यावर जोडाक्षर घ्यावे. उदा. पूर्ण र हे अक्षर र रॅ रं रः, रा रॉ रां राः ......... रौ रौं रौः याप्रमाणे संपल्यावर र्क र्ख र्ग ही अक्षरे त्याच क्रमाने घ्यावीत.

## (६) अनुनासिकाबाबत

अनुनासिके शिरोबिंदूनेच दाखवावीत, म्हणजे जोडाक्षर-संख्या कमी होऊन वर्णक्रमीचे काम सुलभ होईल.

(७) आतापर्यंत आपण वर्णमाला निश्चित केली. ती करूनही काही अडचणी शिल्लक राहतातच. त्यांचा विचार करू.

कलम २ मध्ये डॉ. केळकर म्हणतात, " पद आणि त्याने आरंभ होणाऱ्या पदांच्या साखळ्या ह्यामध्ये दुसरी पदे घुसण्याचा संभव असतो. ' विमा ' आणि ' विमायोजना ह्यांच्यामध्ये ' विमान ' घुसेल. "

इथे एका गोष्टीचा खुलासा करायला हवा. वर्णक्रमी ही दोन पद्धतींनी रचता येते.

(१) वर्णानुसारी – Letter by Letter.

(२) पदानुसारी – Word by Word.

पहिल्या पद्धतीत वर्ण किंवा अक्षर हे घटक मानतात, तर दुसऱ्या पद्धतीत पद किंवा शब्द हा घटक मानतात. म्हणूनच पहिल्या पद्धतीत दोन पदांतील अंतर किंवा ' — ' असे संयोगीचिन्ह विचारात घेत नाहीत. याउलट, दुसऱ्या पद्धतीत, पद संपले की वर्णक्रम संपतो. त्या पदानंतर येणारे दुसरे पद हे पुन्हा वर्णानुक्रमाने रचावयाचे असते.

याप्रमाणे वर्णानुसारी पद्धती खालीलप्रमाणे रचून दाखविता येईल;

विमा
विमान
विमानतळ
विमायोजना

याउलट, पदानुसारी पद्धती अशी होईल.

विमा
विमायोजना
विमान
विमानतळ

हीच पदानुसारी पद्धती खालीलप्रमाणेही रचून दाखविता येते.

विमा
  कंपनी
  योजना
  हप्ता
विमान

तळ
विद्या
सेवा

( ८ ) याखेरीज संक्षेपात्मक शब्द आणि संख्यावाचक अंक वर्णक्रमी जुळविताना अडचणी उत्पन्न करतात. तेव्हा, संक्षेपात्मक शब्द पूर्ण स्वरूपात घ्यावा आणि संख्यावाचक अंक अक्षरी स्वरूपात घ्यावा, हा नियम पाळणे इष्ट ठरेल.

**समारोप** : याप्रमाणे वर्णक्रमी रचली असता तिचा उपयोग करणारास ती सोईची होईल.

* * *

## साभार स्वीकार

### चरित्र

**वैद्य प्रभाकर** : सरदार वल्लभभाई पटेल, अभिनव प्रकाशन, मुंबई १४, रु.३०
**तळवलकर गोविंद** : बाळ गंगाधर टिळक, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४, रु. ७.५०.

### काव्य

**प्रामाणिक लक्ष्मीकांत** : सरोवर, मराठवाडा साहित्य-परिषद. औरंगाबाद, रु. ७.
**बोडके नरेंद्र** : पंखपैल, गोमंतक साहित्यसेवक मंडळ, पणजी, रु. ५.
**वडेर प्रल्हाद आणि बोडके नरेंद्र** : ( संपादन ) स्वातंत्र्योत्तर गोमंतकीय मराठी कविता; साहित्यसेवक मंडळ, पणजी, गोवा; रु. १०.
**पठाण यू. म.** : ( संपादन ) 'उखाहरण ( कवि चोंभा विरचित ), मराठवाडा विद्यापीठ प्रकाशन, औरंगाबाद, रु. ३५.
**मेश्राम केशव** : उत्खनन, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, रु. ८.
**आंगले नीलिमा** : पऱ्यांचा देश, सौ. लीला आंगले, पणजी गोवा, रु. ३.५०.
**बाबुलनाथ** : त्रिशूळ, सौ. सरोजिनी काळे, पुणे ११, रु. २.
**पानसे रमेश** : आम्ही कुणीही नाही, अरुंधती पानसे, ठाणे रु. ३.
**शाहीर साबळे** : आधुनिक मानवाची कहाणी, अभिनव प्रकाशन, मुंबई १४.
**तांबे शांताराम** : स्वप्न, तांबे एस. जी., ओतूर रु. ३.

६

# ज्ञानदेवांचे (?) एक कूट पद

**पंडित आवळीकर**

'काव्यसंग्रहा'च्या तेराव्या पुष्पात 'अनेककविकृत पदे, कटाव, लावण्या वगैरें'चा संग्रह कै. वामन दाजी ओक यांनी केलेला आहे. त्यांनी संपादित केलेल्या 'पदसंग्रह (भाग पहिला)' या संकलनात ज्ञानदेवांची बावीस पदे आढळतात. ही सर्व रचना ज्ञानदेवांचीच आहे काय, हा प्रश्न ही पदे वाचताना पदोपदी आपल्यापुढे उभा राहात असतो. ज्ञानदेवांच्या शंकास्पद (Apocryphal) वाङ्मयात त्यांची गणना करावी लागेल असा विचार माझ्या मनात येतो.

या बावीस पदांत 'कांस्याच्या अणिवर वसति तीन गांव' या नावाचे एक कूट पद आहे. या पदाची जात भारुडाची आहे. पदाच्या अखेरीस 'ज्ञानदेव म्हणे' असा उल्लेखही आहे. पण तेवढ्या आधारावर हे पद ज्ञानदेवांचे आहे असे म्हणणे योग्य ठरणार नाही. या पदाची भाषाही ज्ञानदेवकालीन किंवा/आणि ज्ञानदेवांची आहे काय, या प्रश्नाचेही उत्तर शोधणे आवश्यक आहे. म्हणजेच मला हे पद ज्ञानदेवांचे की आणखी कोणाचे, यासंबंधी थोडासा विचार करावयाचा आहे. कै. ओक यांनी दिलेले पद असे आहे—

कांस्याच्या अणिवर वसति तिन गांव।
दोन ओसाड, एक वसेचि ना॥
वसेचि ना तेथें आले तीन कुंभार।
दोन थोटे, एक घडीच ना॥
घडीच ना त्यानें घडलीं तीन मडकीं।
दोन कचीं, एक भाजेचि ना॥
भाजेचि ना त्यांत रांधले तीन मुगे।
दोन हिरवे, एक शिजेचि ना॥
शिजेचि ना तेथें आले तीन पाहुणे।
दोन रुसले, एक जेवीच ना॥
जेवीच ना त्याला दिल्ह्या तीन म्हशी।
दोन वांजा, एक फळेचि ना॥

अनुक्रमणिका

फळेचि ना तिला झाले तीन टोणगे।
दोन मेले, एक वांचेचि ना।।
वांचेचि ना त्याचे आले तीन रुपये।
दोन खोटे, एक चालेचि ना।।
चालेचि ना तेथें आले तीन पारखी।
दोन आंधळे, एका दिसेचि ना।।
दिसेचि ना त्याला मारल्या तीन बुक्या।
दोन हुकल्या, एक लागेचि ना।।
ज्ञानदेव म्हणे याचा तो अनुभव।
सद्‌गुरुवाचुनि कळेचि ना।।

हे पद परंपरेने ज्ञानदेवांचे मानले गेले आहे. आजही भजनी मंडळी ज्ञानदेवांचे म्हणूनच हे पद गाताना दिसतात. भजनी मंडळीच काय, पण शाहिरी परंपरेनेही या पदाचे कर्तृत्व ज्ञानदेवांना दिलेले दिसते. माझ्याकडील काही अप्रसिद्ध शाहिरी रचनांपैकी (एका बाडातील) 'नारायण बापु' नावाच्या एका शाहिराच्या रचनेचा या संदर्भात निर्देश करतो. हा 'नारायण बापु' कोण, कोठला, कोणत्या काळातला या संबंधीची चर्चा येथे न करता त्याने या पदातील 'कूटाचा' उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे : या पदातील तात्त्विक आशय स्पष्ट केला आहे; एवढेच या ठिकाणी नमूद करतो. कारण या पदाचा 'कूट' म्हणून विचार करणे हा स्वतंत्र विवेचनाचा विषय आहे. 'नारायण बापु' या नावाचा एक शाहीर हे पद ज्ञानदेवांचे मानतो एवढाच मुद्दा पदाचे कर्तृत्व कोणाचे या प्रश्नाशी संबद्ध आहे.

हे पद निर्विवादपणे ज्ञानदेवांचेच मानण्यात भाषेची अडचण महत्त्वाची आहे. या पदाची भाषा ज्ञानदेवकालीन किंवा/आणि ज्ञानदेवांची वाटत नाही. 'अणि' सारखा शब्द ज्ञानदेवांनी 'मग अणियांचे वेचळ' (ज्ञा. १५/९२) मध्ये वापरला असला किंवा 'ॐस' ('ओसाड' नव्हे!) शब्दाचा आढळ 'मागां ॐस फूल देटीं' (ज्ञा. ९/४०९) मध्ये झाला; किंवा 'बुकि' ('बुक्क्या' या अर्थाने) असा शब्द 'दांडियांचे घाये बुकि। धाडणें जैसें' (ज्ञा. १८/२२९) मध्ये सापडला तरी या पदातील शब्दसंग्रह व भाषेचा वापर ज्ञानदेवांचा वाटत नाही. 'रुपये' सारख्या अर्वाचीन शब्दाचा उपयोग ज्ञानदेव करतील काय? या पदातील भाषेचे अर्वाचीनीकरण झाले असावे असाही मुद्दा हे पद ज्ञानदेवांचे मानण्यासाठी उपस्थित करण्यासारखा आहे.

हे पद ज्ञानदेवांचे आहे किंवा नाही याबाबत निर्णय देण्याची भूमिका मी घेतलेली नाही. त्यांच्या या शंकास्पद (Apocryphal) रचनेचे कर्तृत्व पुढेमागे निश्चित

अनुक्रमणिका

होऊ शकले तर त्यावेळी विचारात घेण्याजोगे उलटसुलट आधार अभ्यासकांपुढे मांडावेत हा उद्देश पुन्हा स्पष्ट करून एक वेगळा मुद्दा सांगतो.

अगदी याच अर्थाचे पुरंदरदासांचे एक कन्नड पद आहे. ज्याला आपण 'भारुड' म्हणतो त्यासारख्या पदाला कन्नडमध्ये 'मुंडिगे' म्हणतात. मराठी 'भारुड' आणि कन्नड 'मुंडिगे' यांचा तौलनिक अभ्यास झाला पाहिजे असे मत मी 'पुरंदरदास आणि एकनाथ' या लेखात मांडलेले आहे. (माझा हा लेख पुरंदरदासांवरील कन्नड ग्रंथात प्रसिद्ध झालेला आहे.) ज्ञानदेवांच्या (?) आणि पुरंदरदासांच्या पदांतील साम्य कसे व किती आहे हे स्पष्ट होण्यासाठी पुरंदरदासांचे कन्नड पद देतो—

मुळ्ळकोनेय मेले मूरू केरेय कट्टि।
यर्डु बरिदु, वंदु तुंबलिल्ल ॥ १ ॥
(कांट्याच्या टोंकावर तीन तळीं बांधलीं।
दोन कोरडीं, एक भरलेंच नाही ॥)
तुंबलिल्लद केरेगे वंदरू मूरू वड्डरू।
इब्बरू कुंटरू, बब्बगे काले इल्ल ॥ २ ॥
(न भरलेल्या तळ्याकडे आले तीन वडार।
दोन लंगडे, एकाला पायच नाहीं ॥)
कालु इल्लद वड्डरिगे कोट्टरू मूरू यम्मेगळ।
यर्डु बरडु, वंदक्क करुवे इल्ल ॥ ३ ॥
(पाय नसलेल्या वडाराला दिल्या तीन म्हशी।
दोन वांझ, एकीला रेडकूंच नाहीं ॥)
करुविल्लद यम्मगे कोट्टरु मूरु होन्नुगळा
यर्डु समकलु, वंदु सल्लले इल्ल ॥ ४ ॥
(रेडकूं नसलेल्या म्हशीला दिले तीन होन।
दोन गुळगुळीत, एक चाललाच नाहीं ॥
सल्लद होन्नुगळिगे वंदरू मूरू नोटकाररू।
इब्बरू कुरूडरू, बब्बगे कण्णे इल्ल ॥ ५ ॥
(चाललेल्या होनाकडे आले तीन पारखी।
दोन आंधळे, एकाला डोळाच नाहीं ॥)
कण्णिल्लद नोटकारिगे कोट्टरू मूरू ऊरुगळ।
यर्डु हाळूरू, वंदु वक्कले इल्ल ॥ ६ ॥
(डोळा नसलेल्या पारख्याला दिलीं तीन गांवं।
दोन ओसाड, एक वसलेंच नाहीं ॥)
वक्कलिल्द ऊरगे वंदरू मूरू कुंबाररू।

इब्बरू चोंत्ररू, वब्बगे कैय्ये इल्ल ।। ७ ।।
( न वसलेल्या गांवांत आले तीन कुंभार !
दोन थोटे, एकाला हातच नाहीं ।। )
कै इल्लद कुंबाररू माडिदरू मूरू मडकेगळ ।
यर्डु वडकु, वंदक्के बुडवे इल्ल ॥ ८ ।।
( हात नसलेल्या कुंभारानें केलीं तीन मडकीं ।
दोन फुटकीं, एकाला बूडच नाहीं ।। )
बुडविल्लद गडिगेगे हाकिदरू अक्किगळ ।
यर्डु हंजक्कि, वंदु बेयलिल्ल ॥ ९ ।।
( बूड नसलेल्या गाडग्यांत घातले तांदूळ ।
दोन कच्चे, एक शिजलाच नाहीं ॥ )
बेयलिल्लद अक्किगे वंदरू मूरू नंटरू ।
इब्बरू उण्णरू, वब्बगे हसिवे इल्ल ।। १० ।।
( न शिजलेल्या तांदळाला आले तीन पाहुणे ।
दोन न जेवणारे, एकाला भूकच नाहीं ॥ )
हसिवे इल्लद नंटरिगे कोट्टरू मूरू टोणपेगळ ।
यर्डु सोकवु, वंदु ताकले इल्ल ।। ११ ।।
( भूक नसलेल्या पाहुण्याला दिले तीन टोणपे ।
दोन हुकले, एक लागलाच नाहीं ।। )
इन्नु ई अर्थगळेल्ल पुरंदरविठ्ठल वल्ल ।
अन्यरारू तिळिदवरिल्ल ।। १२ ।।
( सगळा हा अर्थ पुरंदरविठ्ठल जाणे ।
दुसरा कोणी जाणणारा नाहीं ।। )

मराठी पदात ' तळी ', ' वडार ' यांचा निर्देश नाही. तेथे पाहुण्याला म्हशी दिल्या असे आहे, तर कन्नड पदात त्या वडाराला दिल्या आहेत. मराठी पदातील ' मुगे ' कन्नड पदात ' अक्की ' ( तांदूळ ) बनले आहेत. ' रुपये ' ' होन ' बनले आहेत. असे काही बदल झाले असले तरी एक पद हे दुसऱ्याचे उघडउघड भाषांतर आहे.

मग हे भाषांतर कोणी केले ? मूळ पद कोणते ? मराठी की कन्नड ? कालदृष्ट्या पुरंदरदास ( श. १४०६–१४८६ ) हे ज्ञानदेवोत्तरकालीन आहेत याविषयी शंकाच नाही. तेव्हा चर्चाविषय झालेले पद ज्ञानदेवांचेच असेल तर त्यांच्यानंतर दोन शतकांनी होऊन गेलेल्या पुरंदरदासांनी त्याचे भाषांतर करणे असंभवनीय नाही. शिवाय पुरंदरदास हे मूळचे सासवडजवळच्या पुरंदरचे हे खरे असेल तर त्यांचा मराठी

भाषा व ज्ञानदेव यांच्याशी परिचय असावा असे मानण्यात काहीच अडचण नाही. मराठी–कन्नड संबंधावर प्रकाश पडण्याच्या दृष्टीने कन्नड कवी कुमारव्यास यांच्या भाषेतील मराठी वळणाचा सखोल अभ्यास झाला पाहिजे असे जसे वाटते, तसेच पुरंदरदासांच्या भाषेतीलही मराठीपण शोधले पाहिजे असे मला वाटते. प्रस्तुत कन्नड पदात आलेल्या मडके ( गळ ), बुड ( बे ) आणि टोणपे ( गळ ) या शब्दांचे त्या दृष्टीने मला फार महत्त्व वाटते. रे. किटेलने आपल्या कन्नड–इंग्रजी कोशात हे शब्द दिलेले असले तरी शुद्ध कन्नड शब्द म्हणून दिलेले नाहीत, हे या संदर्भात ध्यानी घेण्यासारखे आहे. पुरंदरदास जर ज्ञानदेवांचे ऋणी आहेत असे या पदापुरते ठरले तर त्यांचा व त्यांच्या समकालीन नामदेवादिकांचा अशाच प्रकारचा प्रभाव अन्यत्र पुरंदरदासांवर दिसतो काय हाही एक संशोधनाचा विषय ठरेल.

पुरंदरदासांच्या कन्नड पदाचे मराठी भाषांतर करून कोणीतरी ते ज्ञानदेवांच्या नावावर रूढ केले असावे असाही तर्क कोणी करील. तो ‘ तर्क ’च ठरेल. त्यापेक्षा पुरंदरदास हे थोर विठ्ठलभक्त होते ( ‘ पुरंदरविठ्ठल ’ हे त्यांचे नावही बोलके आहे ) : महाराष्ट्रात भागवतधर्ममंदिराचा पाया रचणाऱ्या आणि जनमानसात विठ्ठलभक्तीची प्रचंड लाट उठविणाऱ्या ज्ञानदेवांसंबंधी उत्कट प्रेमादर पुरंदरदासांच्या मनात असणे अगदी स्वाभाविक होते. त्यामुळे ज्ञानदेवांच्या एखाद्या पदावर स्वभाषेचा साज त्यांनी चढविणे मला अधिक संभाव्य वाटते.

आपल्या स्फुटरचनेत शेवटी ‘ बापरखुमादेवीवरू ’ असा स्वनामनिर्देश करण्याचा ज्ञानदेवांचा प्रघात पाहता या पदातील ‘ ज्ञानदेव म्हणे ’ ही मुद्रिका या पदाला ज्ञानदेवांच्या शंकास्पद वाङ्मयात ढकलते. परंतु या पदाचे कन्नड भाषांतर पुरंदरदासांच्या नावाशी निगडित असावे ही घटना मला फार महत्त्वाची वाटते. मराठीतील ‘ संत ’ वाङ्मय आणि कन्नडमधील ‘ दास ’ साहित्य यांचे परस्परसंबंध शोधावयास लावणारी वाङ्मयीन घटना असे मी या कृतीचे वर्णन करीन, दोन भाषा व त्यांतील वाङ्मय यांच्या तौलनिक अभ्यासाची दिशा ज्ञानदेवांचे ( ? ) पद दाखविते.

* * *

## साभार स्वीकार

### संकीर्ण

जोशी पं. व्यंकटेशशास्त्री; ढेरे रा. चिं., थिटे गणेश उमाकांत ( संपादन ) : संस्कृतिसुगंध : दास्ताने रामचंद्र आणि कं. रविवार पेठ, पुणे २, रु. ३०

देवकुळे व. ग. : माझा रोजचा व्यायाम कोणता ? मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; रु. ८

अनुक्रमणिका

७

# ' किर्लोस्कर ' मासिकांचे वाङ्मयीन कार्य

## वासू देशपांडे

(एक टिपण)

' वाङ्मयीन नियतकालिके, विद्यमानपर्व, समालोचनपर खास अंक ' हा साहित्य पत्रिकेचा अंक वाचला. (क्र. २०० व २०१, जोड अंक, जानेवारी ते जून १९७७.) एक चांगला संपादित अंक वाचल्याचे समाधान निश्चितपणे मिळाले. समालोचनाशी संबंध नसलेला, ' एक सत्वस्थ व्यक्तिमत्त्व हरपले ! ' हा डॉ. वि. रा. करंदीकरांचा लेख सर्वोत्कृष्ट आहे. कै. रा. श्री. जोगांचे अतिशय सुरेख शब्दचित्र डॉ. करंदीकरांनी रेखाटले आहे, यात संशयच नाही.

किर्लोस्कर मासिकांना या श्रेय–नामावलीत महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे. मराठी नियतकालिकांत किर्लोस्कर मासिकांना खास स्थान आहे. अनेकांना लिहिण्यास या मासिकांनी प्रवृत्त केले. त्यातही दृष्टी अशी की, समाजातल्या अनेक थरांतल्या अनेक मंडळींकडे, वाचकांना आवडेल असे देण्यासारखे खूप असते. हे हेरून त्यांना लिहिते करणे. नंदन कालेलकरांपासून ' रामनगरी 'कार राम नगरकरांपर्यंत अनेकांना लिहिण्यास प्रवृत्त केले ते या मासिकांनीच. मराठी वाङ्मयाच्या कक्षा रुंदावण्याच्या कामात मोठा हातभार लावला किर्लोस्कर मासिकांनीच.

ऐंटेबी विमानतळावरील इस्रायली मुक्तिनाट्याची रोमहर्षक हकीगत किर्लोस्कर-मासिकाने दिली.

ललित लेखनाच्या अनेक प्रकारांना किर्लोस्करने संपन्न केले आहे. ' चाकावरून जगाची चक्कर ' हे नाथ गोडबोले यांचे मुलखावेगळे प्रवासवर्णन किर्लोस्करमध्येच आले. नागेश यावलकरांपासून अनंत काणेकरांपर्यंत अनेकांची प्रवासवर्णने किर्लोस्कर-मध्ये आली. त्यात महर्षी अण्णासाहेब कर्वेसुद्धा आले. भानू शिरधरकरांच्या शिकार-कथा हे आणखी एक उदाहरण. दाजी·गोष्टी हे ताम्हणकरांचे मानसपुत्र हीपण किर्लोस्करांचीच देणगी.

ग. ल. ठोकळ, र. वा. दिघे व म. भा. भोसले यांच्या ग्रामीण कथा किर्लोस्करांनी छापल्या. कै. ओगले यांना किस्से रंगवून सांगण्याची हौस होती, हे हेरून ओगल्यांच्या

काढून किस्से लिहून घेऊन संपादित करून ते छापले. डॉ. केतकरांची ' विचक्षणा ', ना. सी. फडक्यांची ' आशा ' आदी कादंबऱ्या किर्लोस्करमध्येच आल्या.

स्वातंत्र्यवीर सावरकरांचे तेजस्वी लेख किर्लोस्करमध्येच येत होते. त्यांनी या लेखातून परंपरावादी समाजावर किती कोरडे ओढले आहेत ! आजही पुनःपुन्हा वाचावेत असे ते लेख आहेत. मराठी वाङ्मयातील निबंधाचे दालन या लेखांनी समृद्धच झाले. अंधश्रद्धा, बुवाबाजी आदी विरुद्धचे कै. डॉ. वा. वा. देवधर यांचे लेखही असेच प्रभावी आहेत.

स्त्रियांना लिहावयासही किर्लोस्कर मासिकांनी प्रवृत्त केले. आनंदीबाई शिर्के, मालतीबाई बेडेकर, कमलाबाई फडके यांचे लेखन स्त्री–किर्लोस्करमध्ये येत असे. अगदी आजच्या लेखिका दीपा गोवारीकर व शैला लोहिया यांचे लेखनही ' स्त्री 'मध्येच आले. स्त्रियांच्या अनेक प्रश्नांवर या मासिकाने चर्चा केली. स्त्रियांचे मेळावे घेऊन त्यांचे मनोगत नोंदले. स्त्रियांचा पेहराव कसा हवा होता हे मत एका ' स्त्रीचे ' चित्र देऊन कै. आगरकरांनी जुलै १९३१ च्या मुखपृष्ठावर व्यक्त केले होते.

मराठी मासिकांत व्यंगचित्रे छापली किर्लोस्करांनी. ' वारे कुटुंब ! ', ' अस्पृश्यतेचा अभेद्य तट ', ' जीवनाच्या यशोमंदिराच्या पायऱ्या ' आदी त्यांतील व्यंगचित्रे कितीतरी बोलकी आहेत. ' टाकीचे घाव ' हे मराठी वाङ्मयाचे लेणे आहे. शंकरभाऊंची व्यंगचित्रे आणि ना. सी. फडके यांचे भाष्य त्यात आहे. ' मनोहरची आकाशवाणी' ही प्रा. ना. सी. फडके यांची भाषणे ' मनोहर 'ने छापली. त्यांतही संपादकांची कल्पकता जाणवते.

अशा अनेक बाबी नोंदता येतील. पण एका टिपणात किती बाबी नोंदायच्या ? किर्लोस्कर मासिकांना वेगळ्या प्रशस्तीची गरजच नाही !

* * *

## सरकारी पारितोषिके

" हे लोकशाहीचे युग आहे. सरकार आपणच निवडून दिलेले, म्हणजे आपलेच आहे. घरच्या वडीलधाऱ्या मंडळींनी कौतुक केले तर आपण आनंदित होतो. त्याच भावनेने सरकारी पारितोषिके स्वीकारली जावीत, असे माझे स्पष्ट मत आहे. उलट सरकारने जास्त रकमेची पारितोषिके द्यावीत, त्यांच्या संख्येत वाढ करावी; आणि लेखकांच्या पंक्तीला प्रकाशकांनाही बसवावे, अशी माझी आग्रहाची सूचना आहे.

—ग. ल. ठोकळ

८

# चापेकरांचे पत्रिका–संपादन

## मधुसूदन परशुराम पेठे

कै. नारायण गोविंद चापेकर हे ' महाराष्ट्र साहित्य पत्रिके 'चे पहिले संपादक. मार्च १९२९ ते मार्च १९३३ अशी पूर्ण पाच वर्षे त्यांनी साहित्य पत्रिकेचे संपादन केले, साहित्य परिषदेच्या मुखपत्राची चापेकरांनी मुहूर्तमेढ रोवली. त्यांनी संपादिलेल्या एकूण एकोणीस अंकांचे हे धावते समालोचन आहे.

भारतीय स्वातंत्र्यसूर्याचा अस्त झाल्यानंतर भारतीय जीवनाला पाश्चात्त्य संस्कृती व इंग्रजी वाङ्मय यांचे साहचर्य लाभले. यातूनच मराठी गद्य वाङ्मयाचे नवयुग सुरू झाले. ' दिग्दर्शन ' या जांभेकर-संपादित मासिकातून मराठी भाषेतील सर्व विषयांचा संग्रह लोकांपुढे येऊ लागला. प्रभाकर, निबंधमाला, केसरी, सुधारक, विविधज्ञान–विस्तार, मासिक मनोरंजन, केरळ कोकिळ यांसारखी वृत्तपत्रे–मासिके यांमधून मराठी वाङ्मय नवा आकार धारण करून समृद्ध होत होते. परंतु साहित्यनिर्मितीपेक्षा ज्ञान-प्रसार हाच या काळातील मासिकांचा उद्देश होता. एकीकडे ललित वाङ्मयाचे दालन हळूहळू समृद्ध होत होते व त्याचा साहित्यिक दृष्टीने परामर्शही घेतला जात होता. पण तो गौण स्वरूपाचा होता. केवळ मराठी साहित्यासाठी वाहिलेले एखादे मासिक काढून मराठी वाङ्मयाच्या अभ्युदयाच्या दृष्टीने विशेष प्रयत्न होण्याची जरूरी भासत होती. अकोला येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाने ही उणीव भरून काढण्याचे ठरविले.

### ' पत्रिके 'चा पूर्वेतिहास

ऑक्टोबर १९१२ मध्ये अकोला येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुख-पत्र म्हणून एक लहानसे मासिक काढावे, ते मुखपत्र एखाद्या भारदस्त मासिकास जोडून पुरवणी म्हणून त्याची पृष्ठे छापावीत व सदस्यांना ती पाठवावी, असे ठर-विण्यात आले. या निर्णयानुसार त्या काळात मान्यता पावलेल्या ' विविधज्ञानविस्तार ' या मासिकाला जोडून आजच्या साहित्य पत्रिकेचा पहिला अंक प्रसिद्ध झाला.[1] हे वर्ष होते इ. स. १९१३. यानंतर इ. स. १९२५ पर्यंत या मासिकाचे कधी दरमहा

१. ' विविधज्ञानविस्तार ', व. ४४, अं. ८, ऑगस्ट १९१३.

तर कधी तीन महिन्यांनी अंक प्रसिद्ध होत होते.[2] मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी ठरविलेल्या ध्येय-धोरणास अनुसरून या ‘ पत्रिके ’चे कार्य चालू होते खरे, परंतु ते सारे विविधज्ञानविस्तारासारख्या प्रभावी मासिकाच्या छायेत चालल्यामुळे ‘ पत्रिके ’चा स्वतंत्र असा प्रभाव पडत नव्हता. तिची पृष्ठसंख्या मर्यादित होती. त्यामुळे नव्या उपक्रमांना वाव नव्हता. तात्पुरती व्यवस्था म्हणता म्हणता एका तपाचा कालावधी लोटला. ‘ पत्रिके ’ ची ही आश्रित अवस्था संपून तिला स्वतंत्र अस्तित्व लाभले, ते वर्ष होते इ. स. १९२८.

## ‘ पत्रिके ’चा नवा अवतार

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या १३ ऑक्टो. १९२७ च्या वार्षिक सभेत ‘ महाराष्ट्र साहित्य पत्रिका ’ स्वतंत्रपणे प्रसिद्ध करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्या वेळचे परिषदेचे कार्याध्यक्ष ना. गो. चापेकर यांनी पत्रिकेचा पहिला स्वतंत्र अंक प्रसिद्ध केला.[3]

## ‘ पत्रिके ’ची चापेकरांनी सांगितलेली ध्येय धोरणे

स्वतंत्र स्वरूपात निघू लागलेल्या ‘ पत्रिके ’चे ना. गो. ऊर्फ नानासाहेब चाफेकर हे पहिले संपादक. मात्र मार्च १९२८ पासून मार्च १९३३ पर्यंत पत्रिकेचे जे १९ अंक प्रसिद्ध झाले, त्यापैकी कोणत्याच अंकावर संपादक चापेकर असा उल्लेख नाही ! त्यानंतरच्या पुढल्याच अंकात पत्रिकेचा अंक संपादक द. वा. पोतदार या उल्लेखानिशी झळकलेला आहे. अंकावर जसे श्री. चापेकर यांचे नाव नाही तसे पहिल्या अंकात पत्रिकेची जी रूपरेखा प्रसिद्ध झाली आहे त्यावरही त्यांच्या नावाचा उल्लेख नाही ! ‘ पेन्शनीच्या काळातील निर्देश करण्यासारखे पहिले काम ’ म्हणून साहित्य पत्रिकेचा स्वतंत्रपणे त्यांनी आपल्या चरित्रात उल्लेख केलेला आहे. ‘ शंभर पृष्ठांचे त्रैमासिक वक्तशीरपणे अखंड आठ वर्षे मी संपादिले. माझे स्वतःचे लेख त्यांत पुष्कळ आहेत. त्रैमासिकाने कोणतेही विषय वर्ज्य समजू नयेत म्हणून पहिल्याच अंकात मुंबई सरकारचे अंदाजपत्रक व पुढे लष्करी खर्च यासारखे विषय घातले. भाषाशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र वगैरे विषयांचा समावेश करण्यात यावा अशी माझी इच्छा होती. प्रचलित राजकारण, लघुकथा व कविता यांना मात्र ‘ पत्रिके ’त थारा नव्हता ! ”[4]

---

२. मराठी नियतकालिकांची सूची, १९६९, प्रथम खंड, ( पृ. २३७ )

३. महाराष्ट्र–साहित्य–परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी ‘ महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका. ‘ वर्ष १ ले, अंक १ ला, चैत्र शु. १ शके १८५०, गुरुवार, ता. २२ मार्च सन १९२८ ‘ आर्यसंस्कृति मुद्रणालयात व आर्यभूषण छापखान्यात छापले–ना. गो. चापेकर यांनी मराठी साहित्य परिषदेच्या कचेरीत परिषदेतर्फे प्रसिद्ध केले...’

४. जीवनकथा ( आत्मचरित्र ), ना. गो. चापेकर, १९४३, पृ. ९१.

'पत्रिके'च्या पहिल्या अंकात चापेकर यांनी संपादनाची रूपरेखा विस्तृतपणे मांडली आहे. मराठी भाषा व वाङ्मय यांच्या अभिवृद्धीसाठी प्रयत्न करत मराठीच्या अभ्यासास प्रोत्साहन द्यावे व साहित्यक्षेत्रातील महाराष्ट्रीयांच्या आंदोलनाचे नेतृत्व पत्रिकेने करावे अशी त्यांची धारणा होती. त्यांच्या दृष्टीने कोणताही विषय 'पत्रिके'ला वर्ज्य नव्हता. अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, धर्मशास्त्र, इतिहास, भाषाशास्त्र या विषयांवरील मराठीतील लेखनाला पत्रिकेत स्थान मिळावे, विशेषतः समाजशास्त्रीय लेखनाला अधिक वाव असावा, असे त्यांचे मत होते. मराठीतील नव्याने प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांची नोंद पत्रिकेत व्हावी, त्यावर अभिप्राय, परीक्षणे दिली जावीत, अन्य भाषांतील उत्कृष्ट ग्रंथांची ओळख करून देण्यासाठी त्याचा गोषवारा द्यावा व मनोरंजनापेक्षा ज्ञान-संवर्धनाकडे अधिक लक्ष देऊन इंग्रजीतील एखाद्या उत्कृष्ट मासिकाचा दर्जा पत्रिकेला प्राप्त करून द्यावा अशी जिद्द त्यांनी बाळगली होती. या कल्पनेला अनुसरून त्यांनी संपादन केलेला 'पत्रिके'चा पहिला अंक ज्या वेळी प्रसिद्ध झाला त्या वेळी या नावीन्यपूर्ण अंकाचे स्वागत झाले. हैद्राबादचे केशवराव वकील यांनी या अंकाची स्तुती केली व 'या दर्जाचे असे सर्व अंक निघतील का?' अशी पृच्छा केली, असा उल्लेख श्री. चापेकर यांनी केला आहे.[५]

## पत्रिकेचे बहिरंग व अंतरंग

नानासाहेब चापेकर यांच्या कारकीर्दींत, म्हणजे मार्च १९२८ ते मार्च १९३३ या कालावधीत एकूण एकोणीस अंक प्रसिद्ध झाले. आपण अखंड आठ वर्षे पत्रिकेचे संपादन केल्याचा चापेकर यांनी केलेला उल्लेख अर्थातच चुकीचा ठरतो.

या अंकातील मांडणी एका विशिष्ट पद्धतीची आढळते. त्यातील विषय सामाजिक, भाषिक, निबंध, पुस्तक परीक्षणे, ऐतिहासिक, परिषद्वार्ता या क्रमाने मांडले गेले आहेत. सामाजिक विषयांत लोकसाहित्याला विशेष असे स्थान मिळाले असून लोक-कथा, म्हणी व लोकगीते यांच्या संकलनात्मक वाङ्मयाने हे अंक समृद्ध झालेले दिसतात. स्वतः चापेकर यांच्या बरोबरीने म. वि. डोंगरे, का. ब. साने, वि. म. घुले, वि. स. सोहोनी यांचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे.

समाजशास्त्राच्या खालोखाल मराठी भाषा, शुद्धलेखन, व्युत्पत्ती व परिभाषा या विषयांना या अंकांतून जागा मिळालेली असून प्र. धों. कानिटकर, गो. कृ. मोडक, नी. शं. नवरे, वि. ह. निजसुरे आदींनी हे विषय सजविलेले आहेत. मराठीत प्रसिद्ध झालेल्या तत्कालीन ग्रंथांच्या परीक्षणात वा. म. जोशी यांच्या 'सुशीलेचा देव' या कादंबरीचे शं. दा. पेंडसे यांनी केलेले परीक्षण, बाळूताई खरे यांच्या 'अलंकार

५. 'जीवनकथा' (आत्मचरित्र). १९४३, पृ. ९२.
(श्री. केशवराव वकील म्हणजे न्यायमूर्ती केशवराव कोरटकर असावेत.)

मंजूषा ' या ग्रंथाचे वि. ह. निजसुरे यांनी केलेले परीक्षण उल्लेखनीय आहे.
स्वतः नानासाहेब चापेकर यांनी या एकोणीस अंकांतून विपुल लेखन केलेले आहे. त्यांच्या विशेष व्यासंगाचा विषय समाजशास्त्र. त्यावर तर त्यांनी लिहिले आहेच, परंतु इतिहास, मराठी भाषा, सामाजिक टिपणे, अभिप्राय, परीक्षणे मिळून त्यांच्या लेखांची संख्या जवळजवळ पन्नास इतकी भरेल. परीक्षणांपैकी महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास (शं. दा. पेंडसे) अभिनव काव्यप्रकाश, (रा. श्री. जोग), माझे रामायण (द. आ. तुळजापूरकर), धर्मकोश, भगवद्गीतेचे रचनांतर (भारद्वाज) ही परीक्षणे नानासाहेबांच्या व्यासंगी व चिकित्सक बुद्धीची साक्ष पटविणारी आहेत.

## चापेकर यांच्या संपादनाची वैशिष्ट्ये

इतिहास, साहित्य व समाजशास्त्र या विषयांचा नानासाहेब चापेकर यांचा व्यासंग सखोल होता. पत्रिकेतील त्यांच्या लेखनात भाषिक व सामाजिक अशी महत्त्वाची माहिती व टिपणे यांचा समावेश झालेला असून त्यामुळे मराठीतील भाषिक आणि सामाजिक लेखनात मोलाची भर पडलेली आहे. लोकवाङ्मय या नव्या वाङ्मयप्रकाराकडे त्यांनी अभ्यासकांचे लक्ष वेधले व होतकरू संशोधकांना उत्तेजन दिले. आपल्या संपादकीय कारकीर्दीत पत्रिकेला एक विशिष्ट वळण देण्याचा प्रयत्न त्यांनी केला. ते सामाजिक वळण काही जणांना आवडले नाही हे खरे, परंतु त्याचा ठसा न पुसणारा आहे. ज्ञानसेवा व समाजसेवा या नानासाहेबांच्या कार्यातील दोन मूलभूत प्रेरणा. विविध ज्ञानशाखांतून मराठी भाषेत लेखन व्हावे व ती भाषा समृद्ध व्हावी ही त्यांची मनोमन इच्छा. त्यासाठी त्यांनी संग्राहक वृत्तीतून लेखकांना प्रोत्साहन दिले. त्यांच्या या प्रेरणेचे व वृत्तीचे प्रतिबिंब त्यांच्या ' पत्रिके 'च्या संपादनात दिसते. साहित्य परिषद व साहित्य संमेलन या प्रदीर्घ चाललेल्या वादातून चापेकरांना परिषदेच्या कार्याध्यक्षपदाचा केवळ आठ-दहा वर्षांत निरोप घ्यावा लागला. संपादनाच्या कार्यात ' जावयाच्या छापखान्यात अंक छापला ' हा लोकापवादही त्यांना सहन करावा लागला ![६] पत्रिकेशी असलेला त्यांचा संबंध सहाव्या वर्षातल्या पहिल्या अंकाच्या प्रसिद्धीबरोबर १ मार्च ३३ मध्ये, संपुष्टात आला. परंतु इतक्या थोड्या कालावधीतही ' पत्रिके ' विषयी चापेकरांनी केलेले संपादकीय कार्य पाहिले म्हणजे त्यांना ' साहित्य पत्रिकेचे शिल्पकार ' मानले जाते, ते सार्थ ठरते.

---

६. ' जीवनकथा ', १९४३, पृ. ९२.

* * *

# १

# पोतदार आणि साहित्यपत्रिका

**मुकुंद श्रीनिवास कानडे**

रावसाहेब नारायण गोविंद चापेकर हे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे पहिले संपादक. त्यांच्यानंतर महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांकडे ही कामगिरी सोपविण्यात आली. जुलै १९३३ ते डिसेंबर १९३६ या कालावधीत साहित्य पत्रिकेचे एकंदर बारा अंक पोतदारांनी संपादिले.

श्री. दत्तो वामन पोतदार यांचा संपादक म्हणून निर्देश असलेला पत्रिकेचा अंक जुलै १९३३ मध्ये प्रकाशित झाला. या अंकाच्या अखेरीस संपादकीय निवेदनात श्री. पोतदार यांनी आपले मनोगत प्रथमतः व्यक्त केलेले आढळते. त्यांच्यापूर्वीचे पत्रिकेचे संपादक राव. ना. गो. चापेकर यांनी आपल्या कारकीर्दीत पत्रिकेला एक निश्चित वळण दिल्याचे ' मान्य करूनही ' हे विशिष्ट वळण कित्येकांस पसंत नसल्याचे ' आणि म्हणून वाचकांनी श्री. पोतदार यांच्याकडून ' नवीन वळणाची अपेक्षा प्रकट केल्याचे ' ही त्यांनी नमूद केले आहे. पत्रिकेचे स्वरूप काय असावे, यासंबंधी श्री. पोतदार यांची एक निश्चित भूमिका होती आणि ती त्यांनी या संपादकीयात स्पष्टपणे मांडलेली आहे. त्यांच्या मते, " सांप्रत जी विविध मासिके, त्रैमासिके चालतात त्यांनी जे काम आखून घेतले आहे, त्यात अतिक्रमण करण्याचे धोरण या पत्रिकेचे सहसा नसावे. उदाहरणार्थ, ऐतिहासिक शोध. त्याची स्वतंत्र प्रसिद्धीची उत्तम सोय आहे. तसेच लघु वा दीर्घकथा, कविता यांच्या प्रसिद्धीची सोयही साधारण बरी होत असते (असे) म्हणावयास हरकत नाही. परंतु प्रौढ विवेचक टीका, प्रगल्भ परीक्षणे, इतर प्रांतातील व जगांतील साहित्यविषयक उलाढाली यांची माहिती अधिकारी लेखकांकडून कोठे प्रसिद्ध होत नाही. त्याची गरज पत्रिकेला आहे. ( उपरोक्त अंक, पृ. ४८ )

पुढील अंकात श्री. पोतदारांनी साहित्य पत्रिकेचे स्वरूप कसे असावे यासंबंधी आणखी विस्तारपूर्वक ऊहापोह केलेला आहे ( पत्रिका, वर्ष ७, अंक१, पृ. १२–१६ ) त्यात ते लिहितात, " आमच्या मते साहित्य पत्रिकेचे स्वरूप एखाद्या स्वतंत्र साहित्य-विषयक नियतकालिकाप्रमाणे नसावे. म्हणजे ती काव्यशास्त्रविनोदपत्रिका न व्हावी. साहित्यविषयक लेख आणि चर्चा चार ठिकाणी चालते, तींत आणखी एका ठिकाणी तशी भर घालावी हा परिषदेच्या पत्रिकेचा हेतू नसावा. तर व्यक्तिगत प्रयत्नांनी जे

अनुक्रमणिका

साध्य होत नाही, परंतु ज्याची अत्यंत आवश्यकता आहे असे काम परिषदेच्या पत्रिकेने करावे." ही कामे कोणती, त्याचा तपशीलही श्री. पोतदारांनी दिला आहे. परिषदेची कामे आणि परिषदेचे मुखपत्र असलेल्या साहित्यपत्रिकेची कामे ही दोन्ही या ठिकाणी एकरूप झालेली दिसतील. ती पुढीलप्रमाणे—

(१) मराठी भाषेत प्रसिद्ध होणाऱ्या यच्चयावत् सर्व पुस्तकांची नावनिशीवार व शक्य तर वर्गीकृत यादी पत्रिकेत प्रसिद्ध व्हावी. (ही विश्वसनीय असावी व अभिप्रायासह प्रसिद्ध व्हावी.)

(२) या यादीच्या प्रसिद्धीबरोबरच तिचा परामर्शही परिषदेनेच घेणे प्राप्त आहे.

(३) महाराष्ट्रात सर्वत्र महाराष्ट्रभाषेच्या व्यवहारास जर कोठे अडथळे येत असतील तर त्यांची माहिती मिळवून ते दूर करण्यासाठी झटणे.

(४) जागजागची वाङ्मयमंडळे ममतेत घेतली पाहिजेत. परिषद म्हणजे अशा छोट्या स्थानिक मंडळाच्या प्रतिनिधींचा बलवान संघच बनविला पाहिजे.

(५) निरनिराळ्या शास्त्रांतील परिभाषा निश्चित करण्याचे काम परिषदेने हाती घेऊन त्यासंबंधी चर्चा पत्रिकेने दिली पाहिजे.

(६) भोवतालच्या प्रांतिक भाषांचा संसार कसा काय चालला आहे, तसेच जगातील एकंदर प्रमुख भाषांचे संसार कसे चालले आहेत इत्यादींविषयीच्या साधार व सप्रमाण माहितीतील उपयुक्त अंश पत्रिकेच्या द्वारा प्रकट केला पाहिजे.

(७) विख्यात साहित्यिकांची जीवनचरित्रे पत्रिकेत आली पाहिजेत.

जुलै १९३३ मध्ये श्रीगणेशा करून जाने० १९३६ मध्ये श्री. पोतदारांनी आपल्या संपादकीय कारकीर्दीची सांगता केली. पत्रिकेच्या स्वरूपाविषयी आपण जे विविध स्वरूपाचे संकल्प सोडले होते, ते सगळे तडीस नेण्याचा दावा श्री. पोतदारांनीही केला नाही, उलट 'जशी पत्रिकेच्या संपादकाने सेवा करावी असे आमच्या मनास वाटते, तशी सेवा आम्ही केली नाही' असे त्यांनी प्रांजलपणे मान्य केले. (पत्रिका, वर्ष ८, अंक ४, पृ. १३३) हे मान्य करतानाही पत्रिकेच्या संपादनाची जबाबदारी आपण आपणहून पत्करली नव्हती अशी थोडीशी पळवाटही श्री. पोतदारांनी काढून ठेवली आहे. ते लिहितात, "(सेवा) करण्याची जबाबदारी आम्ही अंगीकारलीही नव्हती! एक दोन अंक झाल्यावर निराळीच घटना होऊन आमचेवरील संपादकीय भार आपोआप उतरावयाचा होता. परंतु पुढे वारे सर्व बदलले! आम्ही जे अडकलो ते अडकलो!...आम्हांस सुचले व साधले तसे आम्ही केले!" (कित्ता पृ. १३३)

पत्रिकेच्या संपादनाचे कार्य नाईलाजाने का होईना, एकदा पत्करल्यानंतर श्री. पोतदारांनी आपल्या चतुरस्र बुद्धिमत्तेच्या बळावर पत्रिकेचे स्वरूप जास्तीत जास्त विविध रंगी आणि तितकेच संपन्न करण्याचा आटोकाट प्रयत्न केला यात मात्र कोणताही संदेह नाही. त्यांच्या संपादनाखाली प्रकाशित झालेले पत्रिकेचे तीन वर्षांतील

अंक वरवर चाळले तरी त्यावरून श्री. पोतदारांच्या व्यापक अशा भाषिक दृष्टि-कोणाचा प्रत्यय येतो.

" अद्ययावत नवीन ग्रंथनिर्मितीचा साधार व साभिप्राय परिचय करून देण्याचा संकल्प मात्र श्री. पोतदारांनी जाणीवपूर्वक बाजूस ठेवला. कारण केसरी-मराठा संस्थेच्या वतीने निघणाऱ्या ' सह्याद्रि ' मासिकाच्या द्वारा आणि बडोद्याचे श्री. दंडवते यांच्या ' अभिप्राय संग्राहक ' या नियतकालिकाच्या द्वारा असे दोन उपक्रम होऊ घातल्याने साहित्यपत्रिकेतून हे सदर वगळण्याचे ठरले. ( पत्रिका, वर्ष ७, अंक ३, पृ. ३१ )

तथापि निवडक ग्रंथांचा परामर्श घेण्याचे कार्य मात्र या काळातील पत्रिकेच्या अंकांत चांगले चालू राहिले. चार-दोन ओळींच्या परिचयात्मक मजकुरापासून ग्रंथा-तील विविध विवाद्य स्थळांची साक्षेपी चिकित्सा करणाऱ्या आठ-दहा पानांच्या परीक्षणापर्यंतचे सर्व प्रकार यात अंतर्भूत झालेले आहेत. यांपैकी काही परीक्षणे त्यातील विचारप्रवर्तकतेमुळे आजच्या अभ्यासकालाही मननीय वाटतील. उदा० वेणूताई पानसेकृत हरी नारायण आपटे ( वि. वा. आंबेकर, वर्ष ६, अंक १ ) भारद्वाजकृत भगवद्गीतेचे रचनांतर ( ना. गो. चापेकर, वर्ष ६, अंक १ ) किरातकृत भाषाची नाटके ( चिं. रा. देवधर, वर्ष ६ अंक १ ) दामलेकृत व्याकरणाची राजवाडेकृत समीक्षा ( गो. कृ. मोडक, वर्ष ७, अंक २ ), कृ. पां. कुलकर्णीकृत मराठी भाषा : उद्गम आणि विकास ( ना. गो. चापेकर, वर्ष ७, अंक २ ) वा. म. जोशीकृत इंदू काळे आणि सरला भोळे ( प्रा. दे. द. वाडेकर, वर्ष ८, अंक ३ ) इत्यादी. संपादक-त्वाची जबाबदारी अंगावर येऊन पडल्याने स्वतः श्री. पोतदारांनीही अनेक लहान-मोठ्या पुस्तकांची परीक्षणे केलेली आहेत. श्री. नेने यांनी संपादित केलेल्या अर्वाचीन साहित्य या समालोचनात्मक ग्रंथाचे श्री. पोतदारांनी केलेले विस्तृत परीक्षण त्यांच्या वाङ्मयविषयक चौफेर अवलोकनाची साक्ष पटविणारे आहे. आचार्य अत्रे यांच्या ' गीतगंगा ' या काव्यसंग्रहाचा श्री. पोतदारांनी अगदी थोडक्यात परिचय करून दिला आहे. त्यातील पुढील मार्मिक वाक्य पाहाण्यासारखे आहे. पोतदार लिहितात, " आता आपल्या हातून फारसे काव्य निर्माण होणार नाही असे रा. अत्रे यांनी भविष्य केले आहे. तथापि ते खरे करून दाखविणे त्यांच्या स्वाधीनचे नाही. पूर्वी ते काव्याच्या मागे लागले असतील, पण पुढे जर काव्यच त्यांच्या मागे लागले तर ! तर काय, त्यांची ' गीतगंगा ' सुंदर वनांतून समुद्राला जाऊन का मिळणार नाही ? ' ( वर्ष ८, अंक ३ )

परीक्षणाचे परीक्षण असाही एक प्रकार या काळात दृष्टीस पडतो. ' हिंदुस्थानातील जाती व वंश ' या डॉ. गो. स. घुर्ये यांच्या पुस्तकाचे राव० ना. गो. चापेकर यांनी पत्रिकेत आपल्या चिकित्सक दृष्टीने परीक्षण करून डॉ. घुर्ये यांच्या विवेचनातील

अनुक्रमणिका

अनेक स्थळांबाबतचा मतभेद स्पष्टपणे व्यक्त केला होता. ( वर्ष ५, जानेवारीचा अंक) त्याला प्रत्युत्तर म्हणून डॉ. घुर्ये यांनी एक विस्तृत लेख लिहिला. तो पत्रिकेत प्रकाशित झाला. ( वर्ष ६, अंक ३ ) परंतु पुढे मात्र लेखक व परीक्षक यांच्यातील उत्तरप्रत्युत्तरात्मक वादविवाद प्रसिद्ध न करण्याचे धोरण संपादकांनी प्रकट केले.

श्री. पोतदारांच्या कारकीर्दीत भाषाविषयक लेखनाला चांगले प्रोत्साहन मिळाले. शब्दांचे संकेत, शब्दसिद्धी, किंवा व्युत्पत्ती अशी छोटी टिपणे तर मधून मधून प्रकाशित झालीच, पण प्रयत्नपूर्वक सिद्ध केलेली भूमिती, वैद्यक इ० शास्त्रांतील पारिभाषिक शब्दावलीही प्रकाशित होत राहिली. मराठी व्याकरणात जे विविध वादग्रस्त प्रश्न अभ्यासकाला सतत अस्वस्थ करीत असतात, त्यांबाबत काही एकमत व्हावे या दृष्टीने परिषदेने एक प्रश्नावली तयार केली व तिची उत्तरे अभ्यासकांनी द्यावीत असे आवाहन केले. ( वर्ष ७, अंक ३ ) त्यानुसार आलेल्या उत्तरांची छाननी करून समितीने आपल्या निर्णयाचा एक मसुदा तयार केला. ना. गो. चापेकर, य. रा. दाते कृ. पां. कुलकर्णी, रा. दा. देसाई इ. वैय्याकरणांनी एतत्संबंधी जे निष्कर्ष काढले, ते मराठी व्याकरणाच्या इतिहासात एक महत्त्वाचा टप्पा म्हणून मानले गेले आहेत. वै. का. राजवाडे यांनी हरिभाऊ आपटे यांच्या 'मी' कादंबरीतील भाषिक वैशिष्ट्यांची तपासणी करून हरिभाऊंच्या भाषेवरील इंग्रजी भाषेच्या प्रभावाची अनेक उदाहरणे दाखवून दिली. एखाद्या ललितकृतीची अशा प्रकारची अभ्यासपूर्ण भाषिक चिकित्सा ही त्या काळात अगदी वैशिष्ट्यपूर्ण होती. ( वर्ष ८, अंक ४ ).

भारतातील अन्य भाषाभगिनींचा संसार कसा चालला आहे, याची श्री. पोतदार यांनी विशेष दखल घेतलेली दिसते. भारतेंदु हरिश्चंद्र, नजीर अहमदखान किंवा महमद इकबाल यांसारख्या अ-मराठी साहित्यिकांच्या कामगिरीची माहिती तर पत्रिकेच्या वाचकांना झाली, परंतु सिंधी साहित्य संमेलन, हिंदी साहित्य संमेलन, हिंदुस्तानी ॲकॅडेमी, भारतीय साहित्य परिषद इत्यादी घटनांचा पत्रिकेत आवर्जून समावेश करण्यात आला. 'ज्ञानेश्वरपूर्वकालीन कानडी वाङ्मय' हा प्रा. द. रा. बेंद्रे यांचा प्रदीर्घ व विवेचक लेखही व्यापक भारतीय भूमिकेतूनच प्रकाशित झालेला दिसतो. ( वर्ष ७, अंक ४ व ५ ) कन्नड कविसंमेलनाचे अध्यक्ष व्ही. सीतारामय्या यांच्या भाषणांचा अनुवाद हे आणखी एक असेच उदाहरण आहे. ( वर्ष ६, अंक १ )

मराठी भाषेची सर्वांगीण उन्नती व्हावी यासाठी स्वतंत्र महाराष्ट्र विद्यापीठाची कल्पना या काळात मूळ धरू लागली होती. श्री. पोतदार हे या कल्पनेचे एक जोरकस व क्रियाशील पुरस्कर्ते होते. 'महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन' या संस्थेच्या द्वारे श्री. पोतदारांनी असे विद्यापीठ स्थापन होण्यासाठी जी धडपड केली तिचा इतिहास पत्रिकेच्या अंकांतून पाहावयास मिळतो. ( वर्ष ८, अंक १ ) 'प्रांतिक भाषांचे भवितव्य' हा पोतदार यांचा विस्तृत लेखही याच तळमळीतून निर्माण झालेला आहे. ( वर्ष ८, अंक २ )

कै. वा. अ. भिडे यांच्याकडून लिहून घेतलेला परंतु त्यांच्या मृत्यूमुळे अपूर्ण राहिलेला ' मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ' हा ग्रंथ पत्रिकेच्या सहाव्या वर्षात क्रमशः प्रसिद्ध झाला. त्या वर्षाचा चौथा अंक केवळ याच ग्रंथासाठी राखून ठेवून तो ग्रंथ उपलब्ध होता त्या स्वरूपात अभ्यासकांच्या हाती देण्यात आला.

लोकसाहित्याला उत्तेजन देण्याच्या दृष्टीने आणि हे अपौरुषेय वाङ्मय प्रकाशात आणण्याच्या हेतूने लोकसाहित्याचे काही नमुने पत्रिकेत देण्यात आलेले आहेत. दशावतारांची आख्याने ( वर्ष ६, अंक १ ते ३ ), गोसावी गीते ( वर्ष ६ अंक १ ) वाळेश्वराची गाणी ( वर्ष ६ अंक २ ) यांचा यात निर्देश करता येईल. पुढे मात्र हा उपक्रम मागे पडल्यासारखा दिसतो.

' रद्दीतील रत्ने ' हा असाच एक अभिनव वाङ्मयप्रकार संपादकांनी सातव्या व आठव्या वर्षातील अंकांतून सातत्याने पुरस्कारिलेला आहे. जुनी वर्तमानपत्रे, मासिके, पुस्तके अशा जीर्ण साहित्यातील संग्राह्य भाग वाचकांसमोर ठेवणे असा या सदराचा उद्देश होता. मधून मधून ही रद्दीतील रत्ने शक्यतोंवर भरतीच्या जागेच्या कोंदणांत बसवलेली दिसतात. विशेषतः एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र जीवनाची अनेक मनोरंजक वैशिष्टये या रद्दीतून चमकताना दिसतात.

लोकजीवनाने दर्शन घडविणाऱ्या मराठीतील अनेक म्हणी याच काळातील अंकातून उजेडात आल्या. श्री. नी. शं. नवरे यांनी मोठ्या उत्साहाने या सदराचा वाटा उचललेला आहे.

१९३३ ते १९३६ या काळातील म. सा. पत्रिकेचे हे काही ठळक विशेष होत. तत्पूर्वीच्या, प्राधान्याने समाजशास्त्रीय अशा स्वरूपाचे, हळूहळू भाषिक व वाङ्मयीय स्वरूपात रूपांतर होत गेलेले आढळते. लालित्याला बेताचेच स्थान लाभलेले असले तरी सकस वैचारिक बाजू भक्कम पायावर उभारलेली दिसते, आणि मराठीच्या अभिमानाबरोबरच भारतीय भाषांच्या वाटचालीचाही जिव्हाळ्याने मागोवा घेतलेला दिसतो. हे सर्व श्रेय पोतदारांच्या चतुरस्र व्यक्तिमत्त्वाला आहे यात शंका नाही.

* * *

> आमच्यात आज प्रतिभेची उणीव नाही; जीवनाच्या व्यापक जाणिवेची उणीव आहे. कलोपासनेला लागणाऱ्या उत्कट प्रामाणिकपणाची उणीव आहे! वाङ्मयनिर्मिती ही एक प्रकारची तपश्चर्या आहे हे आम्हांला कळते, पण वळत मात्र नाही.
>
> —वि. स. खांडेकर

# १०

## माधवराव पटवर्धन–संपादित साहित्यपत्रिका

### मंदाकिनी खोले

" पत्रिका ' हे साहित्यिक तत्त्वचर्चेचे आणि संशोधनाचे व्यासपीठ असावे, असे मी स्वतःशी ठरविले. केवळ लालित्याला इतरत्र भरपूर वाव आहे. लिखाण चर्चात्मक आणि संशोधनात्मक असून मनोरंजन झाले तर दुधात साखर पडली. पण केवळ साखर पेरायची नाही..." ही संपादक या नात्याने स्वतःची भूमिका कै. माधवराव पटवर्धनांनी आपल्या संपादकीय निवेदनामध्ये स्पष्ट केली आहे. त्यांनी संपादित केलेल्या अंकांवर नजर टाकल्यास याचा प्रत्यय येतो. पत्रिकेचे ते अनुक्रमाने तिसरे संपादक.

एप्रिल १९३६ ते एप्रिल १९३७ या एक वर्षाच्या कालावधीत पटवर्धनांनी महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चे संपादन केले. एकूण पाच अंक त्यांनी प्रसिद्ध केले. अतिशय आटोपशीर आणि नेटके असे या अंकांचे स्वरूप आहे. त्यांनी संपादित केलेला पहिलाच एप्रिल–जुलै ( ३४–३५ ) हा जोड अंक आहे. त्यामुळे तसे पाहिले तर हे चारच अंक म्हणावे लागतात.

या चारही अंकांचा साकल्याने विचार करता त्यात पुढील प्रमुख विषयांवर लेख आढळतात. महानुभावीय काव्यातील काही छंद, वृद्धाचार, वृद्धाचारः चार शब्द हे तीन लेख महानुभाव वाङ्मयावर प्रकाश टाकणारे आहेत. शिवाय ते वर्ष मराठी व्याकरणाच्या दृष्टीने महत्त्वाचे होते. कारण आधुनिक व्याकरणाचा पाया घालणाऱ्या दादोबा पांडुरंग यांनी आपले मराठी व्याकरण प्रसिद्ध करून शंभर वर्षे पूर्ण झाली होती. त्यामुळे मराठीच्या व्याकरण विभागातीलही बऱ्याचशा विषयांची चर्चा आणि माहिती या अंकातून दिसते. मराठी शब्दांची घटनात्मक चिकित्सा, काही मराठी शब्दांची पूर्वपीठिका, मराठीतील काही ध्वनी व त्यांची चिन्हे, अशिष्ट इंग्रजीतील हिंदी शब्द-संकेत, 'गोपथीप' शब्दाचा अर्थ, छंदशास्त्राचा इतिहास किंवा Principles which should goven definition of part of speech ' यासारखा इंग्रजी लेख इ. लेखांचा निर्देश करता येईल. यांव्यतिरिक्त ह. ना. आपटेकृत 'मी', भाषाशास्त्र-दृष्ट्या रघुनाथपंडित आधी की मोरोपंत ?, मुंबईतील महारांची गाणी किंवा कुलधर्म इ. लेखांतून साहित्यिक तत्त्वचर्चा आणि मनोरंजन हे दोन्ही हेतू साध्य झाल्यासारखे वाटतात.

पहिल्या अंकाचा विस्तार फारसा नसल्याने यातील काही लेखांचा स्वतंत्रपणे परामर्श घेता येईल. ' महानुभावीय काव्यातील काही छंद ' हा डॉ. वि. भि. कोलते यांचा लेख आहे. आजपर्यंतच्या मराठी काव्यामध्ये कधीही न आढळलेले कितीतरी छंद महानुभाव वाङ्मयात आपल्याला दिसून येतात. रुक्मिणीस्वयंवर आणि लक्ष्मणास्वयंवर या दोन हस्तलिखित पोथ्यांमधून घेतलेल्या एकूण छत्तीस छंदांची सोदाहरण माहिती त्यांनी या लेखामध्ये करून दिलेली आहे. महानुभाव वाङ्मयाचे अभ्यासक आणि छंदशास्त्राचे अभ्यासक यांना ती निश्चितच उपयुक्त ठरणारी आहे. यानंतर ' वृद्धाचार ' हा श्री. वा. ना. देशपांडे यांचा लेख. आठवणी व आख्यायिका यांच्या स्वरूपाचा ' वृद्धाचार ' हा लघुग्रंथ आहे. अत्यंत प्राचीन मराठी गद्य म्हणून त्याचे महत्त्व आहे. पण प्राचीन गद्य असूनही त्यातील लेखनाचा दर्जा अतिशय चांगला आहे. आठवणींच्या रूपाने सांगितलेल्या निरनिराळ्या प्रसंगांतील संवादांमुळे या सर्वात एक प्रकारचा जिवंतपणा वाटतो. याचे स्वरूप केवळ निवेदनात्मक नसल्याने कोठेही रुक्षता वाटत नाही. उलट तत्कालीन बोलीभाषेचे त्यातून दर्शन होते. एकूण ४५ वृद्धाचार त्यांनी या लघुग्रंथांमध्ये समाविष्ट केलेले आहेत. वरील लेखाच्या संदर्भातच ' वृद्धाचारांसंबंधी चार शब्द ' हा श्री. बाळकृष्ण महानुभावशास्त्री यांचा एक लेख आहे. या लेखाचे लेखक स्वतः याच संप्रदायातील असल्याने श्री. वा. ना. देशपांडे यांच्या टीपांमध्ये आलेले काही दोष आणि त्यांचा उलगडा त्यांनी आपल्या लेखनामध्ये केलेला आहे. अभ्यासकांच्या दृष्टीने अतिशय उपयुक्त असे हे दोन्ही लेख आहेत.

याव्यतिरिक्त आणखी विस्तृत लेख हे मराठी व्याकरणाच्या संदर्भात लिहिलेले आहेत. मराठी शब्दांची घटनात्मक चिकित्सा हा श्री. ना. गो. चापेकर यांचा लेख. वारंवार वापरात येणाऱ्या परंतु व्याकरणदृष्ट्या फारशा विचारात न घेतल्या गेलेल्या, ताजातवाना, जाणती, अवाढव्य, मुक्काट्याने, दडपणे यांसारख्या शब्दांचा परामर्श चापेकरांनी या लेखामध्ये घेतलेला आहे. ' काही मराठी शब्दांची पूर्वपीठिका ' हा डॉ. पु. वि. बापट यांचा लेख. मराठीत नित्याच्या वापरात येणाऱ्या शंभराहून अधिक शब्दांचा संस्कृत → पाली → अर्धमागधी किंवा महाराष्ट्रीय → मराठी हा प्रवास आणि त्यांच्यात होत गेलेले बदल यांचा इतिहास त्यांनी यामध्ये दिलेला आहे. अभ्यासकांच्या उपयुक्ततेबरोबरच सामान्य वाचकांनाही तो मनोरंजक आणि ज्ञानात भर टाकणारा ठरतो. यानंतर ' मराठीतील काही ध्वनी आणि त्यांची चिन्हे ' हा स्वतः माधवराव पटवर्धन यांचा लेख. या लेखामध्ये ऋ–लृ हे स्वर नव्हेत आणि ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, व्ह ही वस्तुतः व्यंजने ( संयुक्त ) नसून दिखाऊ संयुक्त व्यंजने आहेत असे आपले मत त्यांनी मांडले आहे. श्री. वा. ना. गोखले यांचा ' गोपीथाय शब्दाचा अर्थ ' हा एक चर्चात्मक लेख आहे. या शब्दाचा अर्थ सायनाचार्य, भास्कराचार्य किंवा मॅक्समुल्लर यांनी ' सोमपानाय ' असा दिलेला आहे. त्यांच्या या मताचे

खंडण करून या शब्दाचा अर्थ ' गवांरक्षणाय ' ' गोरक्षणाय ' हाच योग्य आहे, हे पाणिनीच्या सूत्रांच्या आधारे त्यांनी दाखवून दिलेले आहे. ' अशिष्ट इंग्रजीतील हिंदी शब्द ' या चिं. ग. कर्वे यांच्या लेखामध्ये हिंदुस्थानी लोकांच्या सहवासाने आपले काही शब्द युरोपियनांच्या भाषेमध्ये कसे गेले हे सांगून, काही शब्दांचा परिचय या लेखामध्ये करून देण्यात आला आहे. मराठी लेखांबरोबरच व्याकरणाची पायाभूत नावे सांगणारा मिस्. एच. एम्. लँबर्ट यांचा इंग्रजी निबंध हे सर्व लेख आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या लिपीसमितीने घेतलेले लिपीबाबतचे निर्णय, व्याकरणसमितीने मराठी व्याकरणातील वादग्रस्त प्रश्नांविषयी घेतलेले निर्णयही विस्तृत दिले आहेत. यामध्ये वर्णविचार, शब्दांचे वर्गीकरण, विभक्तिविचार, आख्यातविचार, वादग्रस्त प्रयोगनिर्णय इ. सर्व मुद्यांचा तपशिलाने विचार केलेला आहे.

व्याकरणाबरोबरच स्वतः पटवर्धनांचा ' छंदशास्त्राचा इतिहास ' हा एक लेख आहे. छंदशास्त्रावरील समग्र ग्रंथांचे थोडक्यात पण पूर्णपणे मूल्यमापन त्यांनी केलेले आहे. कालक्रमानुसार पंधरा ग्रंथांचा परिचय त्यांनी या लेखामध्ये करून दिलेला आहे. त्यामध्ये केवळ मराठीच नव्हे तर वेदशास्त्रावरील हिंदी आणि गुजराती ग्रंथांचाही समावेश आहे. छंदशास्त्रावरील या सर्व लिखाणाबाबतची त्यांना वाटणारी खंतही त्यांनी व्यक्त केली आहे. छंदशास्त्राची पुनर्घटना किंवा छंदप्रकारात होत गेलेली परिणतावस्था यांचे विवेचन आजवर कोणीही केलेले नाही, असे मत शेवटी त्यांनी व्यक्त केलेले आहे. परंतु छंदशास्त्रावरील ग्रंथाचा समग्र इतिहास अगदी सामान्य वाचकाच्याही डोळ्यांसमोर ते उभा करतात.

याशिवाय इतरही विविध विषयांवरील लेख या अंकामध्ये आलेले आहेत. त्यांमध्ये प्रामुख्याने ' भाषादृष्ट्या रघुनाथपंडित आधी की मोरोपंत ? ' हा प्रा. चिं. नी. जोशी यांचा लेख. प्रो. वि. भि. कोलते व प्रा. अ. का. प्रियोळकर यांच्या उलटसुलट मतांसह, रघुनाथपंडित हा मोरोपंतांच्या आधीचा आहे, या प्रियोळकरांच्या मताला त्यांनी सोदाहरण पुष्टी दिलेली आहे. त्यानंतर ह. ना. आपटेकृत ' मी ' हा प्रि. वै. का. राजवाडे यांचा लेखांक २. आपट्यांच्या ' मी ' या लोकप्रिय कादंबरीचे गुणदोष सांगितलेले आहेत. या कादंबरीतील समर्पक दृष्टांत, उद्धृत उदाहरणे, हरिभाऊंचा विनोद, लेखनातील अवधानता, पुनरुक्ती, त्यातील प्रसंगांची असंभवनीयता, वाचकांचा ठिकठिकाणी होणारा अपेक्षाभंग, ' मी ' या व्यक्तिचित्रावर केलेली उलटसुलट चर्चात्मक टीका आणि समग्र कादंबरीतून व्यक्त होणारे हरिभाऊ, या सर्वांचा विचार या लेखामध्ये लेखकाने केलेला आहे. हा लेख सामान्य वाचकाच्या वाचनाच्या जाणिवा व मर्यादा निश्चितच वृद्धिंगत करणारा आहे. ' मुंबईतील महारांची गाणी ' गोपीनाथ राव प्रधान यांनी संग्रहित केली आहेत. या लेखातील नावीन्य म्हणजे सामाजिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या आजवर फारशा विचारात न घेतल्या गेलेल्या महार समाजा-

तील जानपद गीतांचा संग्रह यामध्ये आहे. या समाजात विशेषतः विवाहप्रसंगी म्हटली जाणारी गीते यामध्ये समाविष्ट करण्यात आलेली आहेत. ती अतिशय मनोरंजक आणि लक्षवेधी वाटतात. या सर्वांतून त्या समाजाची भाषा, त्यांची संस्कृती, त्यांच्या चालीरीती या सर्वांवर काहीसा प्रकाश पडतो. ‘ कुलधर्म ’ या ना. गो. चापेकर यांच्या लेखामध्ये गीतेतील श्लोकांच्या आधारे ‘ कुलधर्म ’ या शब्दाची चर्चा आली असून जातीचे धर्म नसणारे आणि केवळ कुळाचेच धर्म असणारे असे नेमके कुलधर्म कोणते, असा प्रश्न उपस्थित केलेला आहे.

अशा या काही स्वतंत्र लेखांच्याबरोबरच साहित्यपरीक्षणेही झालेली आहेत. या परीक्षणातही आपल्याला विविधता प्रत्ययाला येते. ‘ गुलाबाच्या पाकळ्या ’ या द. र. कवठेकरांच्या लघुकथासंग्रहाचे मार्मिक परीक्षण द. वा. पोतदार यांनी केलेले आहे; आणि ‘ विखुरलेले प्रेम ’ या कादंबरीवरील पोतदारांचे परीक्षणात्मक विवेचन आहे. यामध्ये परीक्षणाबरोबरच विवाहसंस्थेत व कुटुंबसंस्थेत होत जाणाऱ्या बदलांबाबतही काही विचार त्यांनी तदनुषंगाने व्यक्त केलेले आहेत. ‘अर्थ’ या साप्ताहिकाचा परिचयही ते वाचकांना करून देतात. ‘ केदारखंडयात्रा ’ या द. र. करंदीकर यांच्या ग्रंथाचे श्री. चिं. ग. कर्वे यांनी मूल्यमापन केलेले आहे. हिमालययात्रेचे पत्रबद्ध वर्णन या ग्रंथामध्ये आहे. हिमालयातील माहितीच्या, नव्हे तर वाङ्मयीन गुणांच्या दृष्टीने हा ग्रंथ अतिशय उत्कृष्ट असल्याचा अभिप्राय त्यांनी या विस्तृत परीक्षणामध्ये उदाहरणांसह दिलेला आहे. यांबरोबरच ‘ कथामालती ’ या लघुकथासंग्रहाचे श्री. चापेकर यांनी केलेले परीक्षण किंवा ‘ कृष्ण कारस्थान ’ नाटकाचे ना. गो. चापेकर यांनी केलेले आणि ‘ छायाप्रकाश ’ या कादंबरीचे माधवराव पटवर्धन यांनी केलेले परीक्षण यातून त्या त्या कथानकांचे अतिशय मार्मिक विश्लेषण केलेले आढळते. ‘ मराठी संथसूत्रि ’, ‘ शिशुगीत ’ ‘ नाटक कंपनी ’ या ग्रंथांचीही मराठी साहित्यातील उपस्थिती येथे लक्षात घेतलेली आहे. ‘ हंस ’ या हिंदी मासिक पत्रिकेचा श्री. वि. म. कोल्हटकर यांनी परिचय करून दिलेला आहे. मिल्टन या कवीच्या ‘ Paradise Lost ’ या महाकाव्याच्या ‘ नष्टनंदन ’ या भाषांतराचा वैनायक छंदातील चवथ्या सर्गातील काही भाग श्री. ना. ग. जोशी यांनी ‘ सैतान ’ या शीर्षकाखाली दिलेला आहे. ‘ आमच्या इंदूचे शिक्षण ’ या ग्रंथाचे परीक्षण ना. गो. चापेकर यांनी अतिशय विस्तृत केलेले आहे. यामध्ये कथानकाचा परामर्श घेता घेताच त्यांचे स्वतःचेही एकंदर समाज व कुटुंबव्यवस्था यांविषयी व्यक्त केलेले इतरही विचार आहेत. या सर्वांतून त्यांचा चिकित्सक दृष्टिकोण, मार्मिकता, त्यांची चिंतनशीलता यांचा सतत प्रत्यय येतो; आणि केवळ वाङ्मयीन परीक्षणच नव्हे, तर शास्त्रीय पुस्तकांबाबतही माधवराव पटवर्धन दक्ष होते, हे ‘ सुलभ शास्त्रीय ज्ञान ’ या कर्वे संपादित ग्रंथाच्या परीक्षणावरून स्पष्ट होते.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेप्रमाणे कार्य करणाऱ्या कन्नड साहित्य परिषदेचा परिचय श्री. चिं. ग. कर्वे यांनी ' आपली कन्नडपरिषद भगिनी ' या लेखामध्ये करून दिलेला आहे. तिला मिळालेला म्हैसूरच्या राजघराण्याचा आश्रय, त्यातून तिची होत गेलेली प्रगती, या परिषदेतर्फे आखल्या गेलेल्या काही योजना या सर्वांची सविस्तर आणि गौरवपूर्ण माहिती या लेखामध्ये आहे. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेप्रमाणेच कन्नड साहित्य पत्रिकाही निघते. तिचा परिचय श्री. वि. म. कोल्हटकर यांनी करून दिला आहे.

असे हे चारही अंकांचे अतिशय आशयसमृद्ध असे वाङ्मयीन स्वरूप दिसून येते. संपादकांनी निवडलेले संशोधनात्मक, चर्चात्मक लेख, दर्जेदार पुस्तकपरीक्षणे या सर्वांच्यातून त्यांचे मराठी साहित्यावरील प्रेम, भाषाभिवृद्धीची त्यांची कळकळ... धडपड, त्यांचा व्यासंग, संशोधनात्मक, मार्मिक वृत्ती, नावीन्याची व विविधतेची आवड व्यक्त होते. फारसा वेळ नसतानाही, विशेष म्हणजे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या स्वरूपाबाबत सर्वत्र निराशेचा सूर ऐकू येत असतानाही, त्यांनी ही जबाबदारी स्वीकारून यशस्वीपणे कुशल संपादन केले, असे म्हटले तर ते अस्थानी होणार नाही. या आधीचे संपादक श्री. चापेकर आणि प्रो. पोतदार यांनी पत्रिकेला पंडिती आणि व्यापक स्वरूपाचे वळण दिले असून नियतकालिकांत तिला उच्च स्थानही प्राप्त झाले आहे; आणि संपादक या नात्याने तेच स्वरूप आपण कायम ठेवणार असल्याचे पटवर्धनांनी विनयाने पहिल्याच संपादकीय निवेदनात म्हटले आहे. या चारही अंकांच्या द्वारा आपल्या कार्याची पूर्तता झाल्याचे समाधान त्यांच्या शेवटच्या कार्यकारी संपादकीयामध्ये व्यक्त झालेले दिसते. कारण आपल्या मंडळातील सहकाऱ्यांच्या सहकार्यानेच आपण हे संपादनकार्य यशस्वीपणे करू शकलो, हे त्यांनी कृतज्ञतापूर्वक नमूद केलेले आहे; आणि संपादक या नात्याने वाचकांचाही निरोप घेतलेला आहे.

* * *

### मोठ्या सत्त्वाचे लेखक आणि वाचक

मोठ्या सत्त्वाचा आशय पेलायला तितक्याच मोठ्या सत्त्वाचा कलाकार लागतो...मी वाट पाहतो आहे ती अशा कलाकाराची. मी वाट पाहतो आहे ती व्यास, वाल्मीकी, कालिदास, भवभूती यांच्या परंपरेत शोभतील अशा थोर लेखकांची व कवींची ! आणि ह्या लेखकांना व कवींना ओळखतील अशा जाणत्या वाचकांचीही मी वाट पाहतो आहे. मोठ्या सत्त्वाच्या लेखकांसाठी प्रार्थना, मोठ्या सत्त्वाच्या वाचकांसाठी प्रार्थना !

—पु. भा. भावे

# ११

## एकसष्टीच्या उंबरठ्यावरील लोकप्रिय लेखिका

### वसुंधरा पटवर्धन : पंचवीस वर्षांचा लेखनप्रवास

**अंजली अरुण सोमण**

धर्मक्षेत्राप्रमाणे साहित्यक्षेत्रातही काही संप्रदाय असतात. सांप्रदायिकांची या दोन्ही ठिकाणी वाण नसते. पण कुणाच्याही झेंड्याखाली उभे न राहता स्वायत्तपणे विकासाची वाटचाल धुंडाळणारी मंडळी या दोन्ही ठिकाणी हाताच्या बोटावर मोजण्याइतकी थोडीच आढळतात. अशी मंडळी कोणत्याही लोकप्रिय संप्रदायाचे अनुयायित्व स्वीकारीत नाहीत. स्वतःची पृथगात्मता ती जोपासत राहातात. आपल्या प्रकृतीधर्मास जागून स्वानुभूतीच्या नव्या वाटा स्वतंत्रपणे धुंडाळण्यात ती मश्गूल असतात, तरीही साहित्याच्या बदलत्या प्रवाहात ती टिकून राहतात. मराठी कथाप्रांतात असे ते काही मोजके कथाकार आहेत, त्यात वसुंधरा पटवर्धन यांचा समावेश करावा लागेल.

वसुंधराबाईंचा ' संसारशोभा ' हा पहिला कथासंग्रह १९५१ साली प्रसिद्ध झाला. आजपर्यंत त्यांचे सुमारे चौदा कथासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत; व आजही दिवाळी अंकांतून प्रसिद्ध होणाऱ्या त्यांच्या कथा वाचकांचे लक्ष वेधून घेत आहेत. वसुंधराबाईंच्या ह्या लेखन-प्रवासात लेखकांच्या दोन–तीन पिढ्या होऊन गेल्या. यांतील काहींनी मराठी कथेच्या जडणघडणीस विशेष हातभार लावला, तर काही लेखक विस्मृतीच्या गर्तेत लोटले गेले. ह्या पंचवीस वर्षांत फडकेकालीन रंजनप्रधान कथेपासून गाडगीळप्रणीत संज्ञाप्रवाही क्षणचित्रात्मक लेखनापर्यंत कथेचे स्वरूप बदलत गेले. ह्या सर्व घडामोडींत वसुंधरा पटवर्धन यांची कथा ठामपणे उभी राहिली.

वसुंधरा पटवर्धन यांची कथा आपली लोकप्रियता व गुणवत्ता टिकवून आहे; ती केवळ स्वतःच्या कसदारपणामुळे. त्यांची कथा अनुकरणातून अथवा जाणीवपूर्वक केलेल्या परिश्रमातून निर्माण झाली नाही, तर जीवनाच्या सजग अवलोकनातून व अनुभवाच्या सखोलपणातून ती उत्स्फूर्तपणे जन्मली आहे. म्हणूनच या कथेतून त्यांच्या संवेदनशील, सुजाण व चिंतनशील व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय येत असतो. सर्वसामान्यांप्रमाणे दैनंदिन व्यवहार पार पाडताना त्यांच्यातील कलावंत जगापासून दूर जाऊन जीवनातील घटित-अघटितांचा अंतर्मुख होऊन विचार करीत असतो,

अनुक्रमणिका

जीवनातील दुःखाच्या दर्शनाने व्यथित होत असतो; नीतिमूल्यांचा होणारा ऱ्हास बघून व्यथित होत असतो. पण ह्याचवेळी अनीतीच्या व असत्याच्या या कोलाहलातून चांगुलपणाचे, माणुसकीचे व त्यागाचे सुवर्णकण वेचण्याचा तो प्रयत्न करीत असतो. जीवनाबद्दलची ही शिवमय व कल्याणमय प्रेरणा वसुंधराबाईंच्या कथेला एक निर्व्याज व अविकृत स्वरूप देऊन जाते; पण ह्या प्रेरणेची मुळे जीवनात घट्टपणे रुजल्यामुळे बोधवादाचा प्रचारकी थाट मात्र ती आपल्या कथेवर चढवत नाही.

जीवनाची विविध रूपे वसुंधराबाईंच्या कथांमधून दिसत असली तरी त्यांची अनुभूती प्रामुख्याने स्त्रीकेंद्रितच असते. स्त्रीच्या सुखदुःखाच्या नाना परी त्यांच्या कथांमध्ये आढळतात. वासना दाबून परक्या ठिकाणी कष्ट उपसत राहणाऱ्या बालविधवा ('स्त्री', 'बकासूर',) आपल्याला सोडून गेलेल्या नवऱ्याला परत आणण्याचा प्रयत्न करणारी परित्यक्ता ('हेलपाटे') वडिलांचा संसार चालविण्यातच खर्ची पडलेली अविवाहित विमल पाठक ('ग्लानी'); मूल होत नाही म्हणून नवऱ्याचे दुसरे लग्न करून देणारी पार्वती व सवतीच्या मोटेपणाने दडपून गेलेली उमा ('तपश्चर्या') अशी स्त्रीची अनेक रूपे त्या आपल्या कथांमधून साकार करतात.

जीवनात जे दुःख माणसाच्या पदरी पडते त्यात त्याच्या चुकांइतकाच नियतीच्या गैरमर्जीचा वाटा असतो ह्याची जाणीव वसुंधराबाईंच्या मनात सतत जागती राहते. 'घेणेकरी'मध्ये नवऱ्याच्या मृत्यूचं दुःख, केशवपनाचं दुःख; एकुलत्या एक मुलाच्या मृत्यूचं दुःख व स्वतःचा जीव देण्याचा प्रयत्न करूनही जीव न गेल्याचं दुःख अशी नाना दुःखं माईच्या वाट्याला येतात. त्यात नियतीचा वाटा फार मोठा असतो. दुःखांची ही परंपरा मात्र माईंना असा विलक्षण कोडगेपणा बहाल करून जाते की, एके काळी नवऱ्याच्या मृत्यूनं डोके आपटून घेणाऱ्या माई आता मुडदूस झालेल्या नातीच्या मृत्यूची वाट बघत बसतात. निरपराध माईच्या जीवनाची ही ससेहोलपट वाचकांना अस्वस्थ करते. 'घर'मध्ये वडिलांचा प्रपंच चालविणाऱ्या इंदूला स्वतःचे हक्काचे घर मिळावे म्हणून तिची आई तिला लग्नाचा आग्रह करते. पण लग्नानंतर इंदूचा नवरा तिच्या चारित्र्याचा अशा प्रकारे संशय घेतो की, हक्काचे घर मिळूनही इंदू शेवटी 'बेघर'च राहाते. आजच्या सुशिक्षित व मिळवत्या स्त्रीची ही जगावेगळी समस्या वाचणाऱ्याला चक्रावून टाकते.

वसुंधराबाईंच्या बऱ्याचशा कथा स्त्रीप्रधान असल्या तरी पुरुषपात्रांचे मनोविश्लेषण त्या तितक्याच समर्थपणे करू शकतात. 'जती' ही कथा संस्मरणीय बनते ती कथेतील बिलंदर काकाच्या व्यक्तिचित्रणामुळे. शरीराने अधू पण डोक्याने हुशार असलेल्या बाबूकाकाचा विक्षिप्तपणा व त्याचे वहिनीवरील निर्व्याज प्रेम यांचे मार्मिक दर्शन 'बाबूकाका'मध्ये घडते. 'विधुर'मध्ये आपल्या पत्नीच्या मरणाचं दुःख आपली

मुलं विसरली म्हणून कातर होणाऱ्या व त्याच वेळी पत्नीच्या मैत्रिणीकडे नकळत आकर्षित होणाऱ्या यशवंतरावांचे भावविश्व त्या हळुवारपणे टिपतात.

वसुंधराबाईंपाशी असलेल्या मनोविश्लेषणाच्या सामर्थ्यामुळे आपल्या कथेतील कोणत्याही पात्राशी त्या एकरूप होऊ शकतात व त्या पात्राच्या विविध मानसिक अवस्थांचा कलात्मक वेध घेऊ शकतात. ह्या सामर्थ्यामुळेच ' अंकुर ' सारख्या कथेत तेरा वर्षांच्या लिलीच्या अंतःकरणात नकळत उगवणारा पुरुषविषयक आसक्तीचा कोंभ कळीचे फूल घडावे अशा नाजुकपणाने वसुंधराबाई चित्रित करतात. ' तुला कोंड्यावर विकत घेतले आहे, ' असे आईने थट्टेने सांगितल्यानंतर नऊ वर्षांच्या पिपाणीच्या बालमनात जो कल्लोळ दाटून येतो, त्याचे समर्थ चित्रण त्या ' पिपाणी '-मध्ये करतात. बालमनोव्यापारांची ही सूक्ष्म जाण व कथेतील काव्यमयता ह्या दोन्ही कथांना संस्मरणीय बनवतात.

वसुंधराबाईंच्या कथा प्रायः मनोविश्लेषणाला प्राधान्य देणाऱ्या असल्या, तरी हे मनोविश्लेषण घटनानुसारी व काहीसे पारंपरिक स्वरूपाचे असते. पात्रांच्या जाणिवेतील मनोव्यापारांवरच त्या आपले लक्ष केंद्रित करतात; पात्रांच्या सुप्त मनातील संज्ञाप्रवाहांचा मागोवा घेण्याचा त्या प्रयत्न करीत नाहीत. असा प्रयत्न जर त्यांनी केला असता, तर त्यांच्या काही कथा आहेत त्यापेक्षा अधिक प्रभावी बनू शकल्या असत्या. परंतु आविष्काराचे नवे मार्ग चोखाळण्याची किंवा घाटाचे वेगवेगळे प्रयोग करण्याची प्रवृत्ती वसुंधराबाईंपाशी नाही; त्यांच्या कथांचे मर्म त्यांनी नेमकेपणाने वेचलेल्या व नेटकेपणाने मांडलेल्या जीवनानुभवात आहे. हा अनुभव ज्या स्वरूपात त्यांच्याकडे येईल त्याच स्वरूपात कथेत त्याचा आविष्कार होतो. ह्या अनुभवाला परिश्रमपूर्वक कलात्मक अथवा नावीन्यपूर्ण बाह्यरूप देण्याचा प्रयत्न त्यांच्या लेखनात आढळत नाही. म्हणूनच त्यांच्या कथेचे स्वरूप पाल्हाळिक व काही प्रसंगी विस्कळीत असले तरी आविष्काराचा साचेबंदपणा त्यात नसतो.

शैलीकार लेखिका म्हणून वसुंधराबाईंची प्रसिद्धी कधीच नव्हती. कथेच्या नैसर्गिक व अकृत्रिम घाटाला साजेल अशीच त्यांची भाषा अनलंकृत, तरीही आशयाच्या सर्व छटा व्यक्त करणारी असते. आशयाशी एकरूप झाल्यामुळे शब्द आपोआप आशयघन बनतात. " ही मामी अगदीच एवढीशी होती. हाताची करंगळी समोर धरावी, आणि तिला म्हणावे ' मामी.' " (' स्त्री ') किंवा " उजव्या डोळ्याची भिवई धनुष्यासारखी उचलली जाई. कितीतरी वेळ ती भिवई अशी वर असे. वाटे की पिपाणी भिवईने ऐकते. " (' पिपाणी ') अशी टोकदार भाषा त्या सहजपणे लिहून जातात. पु. भा. भाव्यांसारख्या भाषाप्रभू लेखकाने वसुंधराबाईंच्या निवडक कथांच्या प्रस्तावनेत, नेमका आशय व्यक्त करण्याचे लेखिकेचे सामर्थ्य नजरेस आणून दिलेले आहे.

वसुंधराबाईंच्या कथेत माणसाच्या दुःखाला व त्याच्या अगतिकतेला महत्त्वाचे स्थान असले तरी तिच्यामध्ये अतिरंजित भडकपणा किंवा भावविवशता नसते. माणसांना सत्प्रवृत्तींचे अथवा खलत्वाचे भडक रंग देण्याचे त्या कटाक्षाने टाळतात.

वसुंधराबाईंच्या कथालेखनाच्या काही मर्यादा निश्चितच आहेत. कथाविषयांची पुनरावृत्ती व लेखनातील अतिरिक्त पाल्हाळ हे त्यांच्या लेखनातील चटकन जाणवणारे दोष आहेत. जीवनाचे वास्तव दर्शन त्यांच्या कथांमधून घडत असले तरी कथेतून उमटणारे हे त्यांचे जग तीस–चाळीस वर्षांपूर्वीचे आहे. अजूनही त्यांचे कथाविश्व दुःखीकष्टी बालविधवा, वैभव धुळीस मिळालेल्या संस्थानिकांच्या बायका, वडिलांचे संसार चालविणाऱ्या मिळवत्या मुली, लहानपणी ठरलेले लग्न उरी कवटाळून बसलेल्या व सोडून गेलेल्या नवऱ्यांवर निष्ठेने प्रेम करणाऱ्या तेजस्वी व पतिव्रता स्त्रिया यांनी गजबजलेले आहे. या दृष्टीने आधुनिक काळात लेखन करूनही आजच्या बदलत्या जगाशी त्या अनुबंध साधू शकलेल्या नाहीत. नवऱ्याचे दुसरे लग्न करून देणाऱ्या त्यागी स्त्रियांचे चित्र रेखाटण्याचा मोह अजून त्या टाळू शकत नाहीत. असे असले तरी ज्या विश्वात त्या रमतात त्याचे, कोणत्याही कलाबाह्य प्रलोभनाला बळी न पडता प्रामाणिक व प्रत्ययकारी चित्र त्या रेखाटतात. आजही त्यांच्या कथा ताजेपणा टिकवून आहेत, तो ह्यामुळेच.

* * *

### सौ. वसुंधरा कृष्णाजी पटवर्धन

जन्म : १८ एप्रिल १९१७.

[ एप्रिल १९७७ मध्ये वसुंधराबाईंना साठ वर्षे पूर्ण झाली. ह्या निमित्ताने त्यांच्या कथालेखनकर्तृत्वाचा परामर्श घेण्याचा इथे प्रयत्न केलेला आहे. ]

सौ. वसुंधरा पटवर्धन यांचे प्रकाशित कथासंग्रह :

१. 'संसारशोभा,' सौ. सुधा परचुरे, मुंबई, १९५१.
२. 'शोध,' उदय साहित्य प्रकाशन, पुणे, १९५४.
३. 'चेहरा,' 'नव–लेखन,' मुंबई; १९५८,
४. 'पिपाणी,' श्रीराम प्रकाशन, मुंबई; १९६१.
५. 'आदिपुरुष,' ज्ञानराज प्रकाशन, पुणे; १९६१.
६. 'अंतरपाट,' श्रीराम प्रकाशन, मुंबई; १९६२.
७. 'भाग्य,' परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई; १९६२
८. 'प्रतिबिंब,' बा. ल. पाटक प्रकाशन मुंबई; १९६३.
९. 'अद्‌भुत,' बा. ल. पाटक प्रकाशन, मुंबई; १९६३.

१०. ' पांघरूण, ' श्रीराम प्रकाशन, मुंबई; १९६४.
११. ' गीता आणि इतर कथा, ' परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई; १९६७
१२. ' उपासना, ' वा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई; १९६९
१३. ' घडीभराचा प्रवासी, ' कुलकर्णी ग्रंथागार, पुणे; १९७६

येथे विवेचिलेल्या कथा पुढील कथासंग्रहांतून घेतल्या आहेत :
' ग्लानी ' व ' अंकुर ' या कथा ' चेहरा ' या संग्रहातून
' बाबूकाका ' व ' वेणेकरी '—' प्रतिबिंब ' ह्या संग्रहातून
' जती ', ' स्त्री ' व ' तपश्चर्या ' ' आदिपुरुष 'मधून.
' विधुर ' ही कथा ' अंतरपाट 'मधून
' वर ' व ' पिपाणी '—' पिपाणी 'मधून
' बकासूर ' ' पांघरूण ' मधून...

* * *

## साभार स्वीकार

राकेश मोहन : आषाढातील एक दिवस; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; रु.५
कोठारे मुकुंद : ही, का ती ? ती, का ही ?; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; रु.६
पवार रमेश : सोबत तव प्रीतीची; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; रु. ५
कालेलकर मधुसूदन : वादळ, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; रु. ८
दळवी जयवंत : बॅरिस्टर; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; रु. ८
ढेरे रा. चिं. : शोधशिल्प; विश्वकर्मा साहित्यालय, पुणे ३०, रु. २०
दामले प्र. रा. म. गांधीजी-व्यक्तिमत्त्व, कार्य व शिकवण; शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर; रु. ३
कुरुंदकर नरहर : यात्रा; शारदा प्रकाशन, नांदेड; रु. १८
गुरव कृष्णा : कैवल्य लेणे, कृष्णा गुरव, पश्यंती प्रकाशन, कोल्हापूर; रु. १२

# १२

## अनिलांची सत्त्वसंपन्न 'दशपदी'

### ग्रंथसमीक्षक : अनुराधा पोतदार

दहा चरणांच्या कविता. 'अवघ्या एक उणे चाळीस.' अनिलांच्या प्रतिभेचे गेल्या सोळा वर्षांतले हे देणे. छानसे पिकून परिमळलेले एखादे मधुर फळ आतल्याच गंधाने घमघमत असावे, त्यावर पिकलेपणाची मृदु सतेज कांती चढलेली असावी तसे हे दरवळते व्यक्तिमत्त्व. निवत निवत गेलेल्या सोनेरी सौम्य उन्हासारखे. जीवनातील कितीएक कडूगोड अनुभवांच्या आवर्तामधून गेल्यानंतर त्यांचे संचित आता या कवीच्या आणि कवितेच्या अंतर्यामी असे आणि इतके मुरले आहे की, ही अवघी कविताच एका संयत भावगर्भ पातळीवर स्थिरावली आहे. तिच्या संयत आणि परिमित आविष्कारातूनही तिच्या अंतरीचे सामर्थ्य रसिकाला जाणवते, आत्मप्रत्ययाचे खोल समाधान देते आणि सुखदुःखांना सारखेच गोड करणाऱ्या एका सफल जीविताच्या आणि समृद्ध व्यक्तिमत्त्वाच्या अशा सखोल दर्शनाने अंतर्यामी तृप्त होते; तसे होता-होता अंतर्मुख आणि चिंतनशीलही बनते.

'फुलवात', पेर्तेव्हा आणि 'सांगाती' नंतर ही 'दशपदी.' गेली पन्नास वर्षे अनिल आपल्या काव्यजीवनात रमले आहेत. त्यांच्या कवितेच्या विकासमार्गाचा आलेख कुणी काढावा ? त्यांतील टप्पे कुणी शोधावे ? 'दशपदी' हाही या प्रदीर्घ प्रवासातील एखादा मैलाचा दगड नव्हे, हे तर फलित आहे; परिणती आहे. १९३२ साली 'फुलवात' प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'पेर्तेव्हा' आणि १९६१ मध्ये 'सांगाती' रसिकांपुढे आले; या जुन्या संग्रहांतील अनिलांच्या भावकवितेमधून जे व्यक्तिमत्त्व जाणवले, तेही नेहमीच उत्कट व भावगर्भ असूनही संयत, सौम्य, मृदू होते; नाटकी, प्रभावी विवश भावनेची व तशाच शब्दबहुल आविष्काराची बाधा त्याही भावकवितेला कधीच झाली नव्हती. त्यानंतर मागे वळून पाहताना, कधीकाळी अंतरीचा तळ ढवळून टाकणाऱ्या स्वानुभवांच्याच गाभ्याशी, तळाशी जाण्याचे वळ अनिलांच्या दशपदीमध्ये वाढत गेले. जीवनाने जे प्रेम, जी साथसंगत दिली, त्याविषयी मनात दाटलेली कृतज्ञता, कधी 'हारल्याची, हरवल्याची व्यथागर्भ जाणीव,' आपण जी वाट शोधली, तेच आपले श्रेय होते हा आत्मप्रत्यय, दिवसाच्या रंगमंचावर चाललेल्या नाटकाचा तटस्थ पण सुजाण मनाने पाहिलेला शेवट अशा अनेकरंगी भावाशयाने ही दशपदी संपन्न झाली. इतकेच

अनुक्रमणिका

नव्हे तर आपल्या निर्मितिप्रक्रियेची अनुभूती, आणि तिचे काव्यरूप यांचा मागोवाही त्यांना पुऱ्या जाणिवेने या दशपदीमधून घेता आला. अनिलांसारख्या दीर्घजीवी प्रतिभेच्या, समृद्ध काव्यजीवन जगलेल्या कवीची ही अनुभूती सुजाण रसिकांच्याही लेखी निःसंशय मोलाचीच ठरेल. अनिलांच्या दशपद्यांचा हा संग्रह एकत्रित स्वरूपात आज प्रथमच रसिकांपुढे येत असला तरी दशपदी हा काव्यप्रकार अनिल १९५९ पासूनच हाताळत आहेत. त्यांच्या ' सांगाती ' या संग्रहातही यातील काही कविता समाविष्ट झालेल्या होत्याच.

' दशपदी ' या काव्यप्रकारासंबंधीचे विचार आणि मनोगत विशद करणारा अनिलांचा स्वतंत्र लेखही याच काव्यसंग्रहात अंतर्भूत झाला आहे. ' आश्विन 'सारख्या एखाद्या कवितेचा अपवाद सोडल्यास अनिलांनी १९५९ पासून सतत ज्या ज्या कविता लिहिल्या त्या सर्व दहा चरणांच्याच आहेत. मराठी काव्यांत मुक्तच्छंदाचा जो प्रसार गेल्या काही दशकांत झाला, त्यामागे वा. ना. देशपांड्यांच्या बरोबरीने अनिलांचीच सक्रिय प्रेरणा होती, प्रयत्न होते. तेव्हापासूनच ' प्रयोगशील कवी ' हे बिरुद त्यांना ( गौरवार्थी ) चिकटले असले तरी त्यांना मात्र ते रुचत नाही; बोचते, खटकते हे काहीसे स्वाभाविकच होय. कारण प्रयोगासाठी केलेले प्रयोग हा प्रकारच एकूण काव्यनिर्मिति–व्यापारांशी विसंगत आहे, असा कोणत्याही सच्चा प्रतिभावंताप्रमाणे अनिलांचाही दृढ विश्वास आहे. काव्यसंभव एक प्रयोग म्हणून होत नसतो आणि आपल्या काव्यातील कोणत्याही प्रयोगामागे आपली काव्यपूर्व, सहेतुक जाणीव नसते असे अनिलांनी स्वतः स्पष्टपणे सांगितले आहे, " आटापिटा नसावा, सगळं स्वाभाविक वाटलं पाहिजे " असंही ते म्हणतात. दशपदी प्रथम घडली ( अनिल कविता फार सावकाश, थांबून थांबून दिवसदिवस लिहितात, म्हणून घडली ! ) तेव्हा तिच्यामागची प्रेरणा अभावित, अहेतुक असावी. परंतु त्यानंतर आपल्या वृत्तिगांभीर्यानुसार या काव्यप्रकाराचा किती परिपूर्ण विचार त्यांनी आशय व रूप या उभय दृष्टींनी केला होता–अगदी, दशपदीतील प्रत्येक चरणापुढे पूर्णविराम का नसतो, त्याची आवश्यकता कशी नसते, आणि शेवटी उद्‌गारचिन्ह मात्र असते कारण, दशपदी हाच एक उद्‌गार असतो, स्वतःच स्वतःशी,–येथवर केला होता–याची पूर्ण कल्पना, या संग्रहातील त्यांच्या आणि विजया राजाध्यक्ष यांचा संवादरूप लेखावरून येते. निव्वळ चौदा ओळींची कविता लिहिल्याने जसे सुनीत होत नाही, तशीच निव्वळ दहा ओळींची कविता लिहिल्यानेही दशपदी होत नाही, तरीही दशपदीतील आशय–विषय नव्हे–दहा चरणांतच संपूर्णपणे अभिव्यक्त होईल असा असतो असेही ते निःशंकपणे सांगतात, तेव्हा त्यामागे जवळजवळ एक दशकभर ( १९४९ ते १९५९ ) दशपदीचा त्यांनी घेतलेला शोध, चिंतन, प्रयोग ( सहेतुक नव्हे ! ) हे सारे असते. म्हणूनच एका चिंतनशील, संयत भावगर्भ जाणिवेने, तशाच भाववृत्तीने त्यांनी प्रत्येक दशपदी सौम्यपणे उजळून

निवालेली दिसते आणि “ प्रत्येक ओळ कशी वरवर चढत गेल्यासारखी, शेवटची ओळ तर कळसासारखी, ” हे समाधानही दशपदीत त्यांना पूर्णार्थाने लाभते.

आपल्या काव्यसंभवामागे सहेतुक प्रयत्न किंवा प्रयोगाचा अट्टाहास नसतो, हे अनिलांनी तर आग्रहाने सांगितलेच आहे ( आणि त्यांत शंकाही नाही कारण तसे नसते तर या कवितेमध्ये हा ताजेपणा, भावाशयाच्या गाभ्याला भिडल्याची ही परिपूर्ण जाणीव रसिकांनाही आली नसती ) परंतु पंधरा वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडामध्ये त्यांनी फक्त सव्वीस कविता लिहिल्या हेही इथे आठवते; प्रत्येक कविता कोणतीही घाई न करता संपूर्ण विचार करून लिहिलेली असते; ( म्हणून की काय, प्रत्येक कविता त्यांना पाठ असते, तिचे विवरण मनात तयार होते ) प्रत्येक कवीची स्वतःच्या भावानुभवाला भिडण्याची पद्धती वेगळी, स्वतःच्या काव्यात्म जाणीवेमधून, व्यक्तिमत्त्वामधून आलेली; तशीच त्याची निर्मिती प्रक्रियाही सर्वस्वी त्याचीच असते. एखादा कवी अक्षरशः काही मिनिटांमध्ये आपली कविता लिहील आणि तरीही कालांतराने तिच्यात त्याला एका शब्दाचाही फरक करावासा वाटणार नाही किंवा तिचा ताजेपणाही कोमेजणार नाही. अनिलांची काव्यनिर्मितीची पद्धत अशी संथ, स्वस्थ, निवांत; सहसा घाई नाही ( इतर सगळ्याच गोष्टींप्रमाणे ) म्हणूनच की काय, प्रत्येक भावाशय त्यांच्या अंतर्यामी संथपणे मुरत असतो. मढेशी म्हटले तसे झाडावरच पिकून दरवळणाऱ्या फळासारखा तो आतल्याच रसाने घमघमू लागतो, तेव्हाच काव्यरूप घेतो. जणू त्या भावसमाधीत, ‘ कालही स्तब्ध, उगा करून ’ थांबविलेला असतो आणि ‘ जीवस्वराच्या जागा आत धीट, नीट दाखविल्या ’ जातात. कधी कधी, “ ते आतिल चित्र कधी बाहेर न येईल,” अशी व्याकुळ साशंकताही मनाला वेढून टाकते, तर क्वचित सूचनांनाच घाई होते, मग आविष्कारातही तीच घाई ! पहिली ओळ सुचते तेव्हा त्यांतच सगळी कविता बीजरूपाने असते अशी आपली प्रचीती अनिल सांगतात, तेव्हा अंतर्यामी संथपणे मुरलेला त्यांचा भावाशय, गोळीबंद पाकाच्या घट्ट थेंबासारखा, पण अत्यंत सहजपणे आरंभीच्या आविष्कारात सघन स्वरूपात अवतरतो; आणि तरीही, नादमधुर, चटकदार ध्रुवपदातच संपून जाणाऱ्या एखाद्या भावगीताप्रमाणे, त्यांची कविता सुरुवातीच्याच बीजरूप आविष्कारात संपून जात नाही. पाकळीपाकळीने ती फुलत जाते, पायरी-पायरीने चढत जाते, आणि शेवटच्या ओळीत येते, ते इसापनीतीमधल्या गोष्टीसारखे तिचे तात्पर्य नसते, गणितासारखे उत्तर नसते किंवा अनुभवाचे सारही नसते. ते अनुभवाला अत्यंत सहजपणे आलेले अग्र असते; देठाच्या टोकाशी फूल फुलून यावे तसे. आरंभीच बीजरूपाने व्यक्त झालेल्या भावानुभवाची ती सफल, सांग परिणती असते. ‘ लावण्य ’ या दशपदीची ही सुरुवात पहा, “ असे काहीतरी आगळे लावण्य केव्हा कधीकाळी दिसून जाते.”. इथे कवीच्या अंतर्यामी मुरलेल्या भावानुभवाचा मुखडा आपल्याला दिसतो, पुढच्या साऱ्या ओळींमधून त्याचीच रूपकला परोपरीने

अनुक्रमणिका

दिसत राहते आणि " जागच्या जागीच राहून हृदय प्रीतीचा वर्षाव करून घेते!' या शेवटच्या ओळीमध्ये या अनुभवालाच पूर्णता येते, त्याची परिणती दिसते.

दशपदीची अखेर म्हणजे तिच्यात व्यक्त होणाऱ्या अनुभवाचा पूर्णविराम मात्र नसतो कारण दशपदी संपली तरी तिच्या अनुभवाची आवर्तने आपल्या मनात सुरूच राहातात. 'मी' या दशपदींमध्ये "ते सुजाणपण सारे साठवून असतो मी' असे स्वतः-विषयी सांगत असतानाच शेवटी ' माझ्या मनमुकुरातच मज पाहत बसतो मी!" या ओळीने स्वतःविषयीचे हे मनोगत, नकळत एका वेगळ्याच पातळीवर उंचावलेले जाणवते. जणू 'स्व' विषयीचा हा स्वानुभव व्यक्त होत असतानाच, स्वतःमधून अलगद बाजूला घेऊन ते कुणीतरी, स्वतःलाच न्याहाळताना दिसू लागते. अनिलांची शब्दविषयक जाणही अति सूक्ष्म आणि संवेदनशील. त्यांच्या कवितेत शब्द असा तसा, कसाबसा कधीच पडणार नाही, वेचक, घडीव, क्वचित अनोखा पण सार्थ शब्दही अलगद नेमकी जागा घेतो आणि वापरलेल्या प्रत्येक शब्दासाठी कवीचे असे एक समर्थन असते, कविता दिवसेंदिवस मनात घोळत राहिल्याचाही हा परिणाम असावा. आणि म्हणूनच की काय, अनिलांची ही कविता बाह्यात्कारी सोपी, सीधी वाटली तरी ती तशी क्वचितच असते. तिच्या संमिश्र भावाशयामध्ये सखोल, तरल अनुभूतीचे अनेक पदर एकवटलेले असतात.

अनिलांनी दशपदीच्या रूपबंधाचे अतिशय चांगले विवरण आपल्या लेखामधून केले आहे, म्हणून त्या रूपबंधामधून जे साधते त्याची थोडी चर्चा येथे करावीशी वाटली. अनिल स्वतः एक प्रतिभावंत कवी तर खरेच, पण त्याबरोबरच एक जाणकार चिकित्सक, प्रयोगशील अभ्यासक आणि शोधक आस्वादक त्यांच्यामध्ये सदैव जागरूक आहे. त्यामुळेच काव्यनिर्मिती, कलानुभव, काव्यप्रकार, कवितेची भाषा यां-विषयीचे त्यांचे स्वतंत्र, मूलगामी विवेचनही अतिशय महत्त्वाचे ठरले आहे.

फुलवातीनंतर, पेर्तेव्हा, सांगाती आणि आता ही दशपदी. फुलवातीमधील सगळीच भावकविता, यौवनातील जिव्हारी भिडलेल्या एकलक्षी प्रीतीची. 'प्रेमाचे ममत्व' सांगणारी. 'तूं सुखी रहा फुला, तुझ्या जिवात जीव गुंतला' म्हणून आळवणारी. त्या प्रीतीचाच कोवळा प्रकाश या सच्चा कवितेच्या शब्दाशब्दांतून असा फाकला आहे की, एका भावजीवी, सौंदर्यलक्ष्यी मनाची ही भाववाणी नेहमीसाठीच उजळून निघाली आहे; ती कविताही स्वतःशीच बोलणारी किंवा हलक्या मंद कुजबुजीच्या स्वरात 'कुणाला' काही सांगणारी; स्वतःच्याच अंतर्मनात डोकावून पाहणारी. फुलवाती-नंतरच्या अनिलांच्या कवितेमध्ये सामाजिक जाणिवेचा, उद्बोधनाचा, व्यथागर्भ असंतोषाचा एक सूर कधी सरळ स्पष्टपणे तर कधी प्रतीकात्मक स्वरूपात उमटला. परिणामी, 'ही अनिलांची प्रेमकविता', 'ही सामाजिक जाणिवेची कविता' अशी ढोबळ (परीक्षार्थी?) विभागणी केली जाऊ लागली. दशपदीमधून मात्र अनिल

पुन्हा एकदा आपल्या स्वगतासारख्या मंद, हलक्या, सुरात बोलू लागले. 'दशपदी'-मधील या कवितेवर हीं प्रीतीची, ही निसर्गाची, अशी कोणतीच मुद्रा सहजपणे उमटवता येणार नाही. कारण ही सगळीच कविता एका अति संवेदनक्षम, सौंदर्यलक्ष्यी, आत्ममग्न मनाच्या अनेकविध भाववृत्तींची कविता आहे, आणि तरीही ती कुठल्याही क्षणिक भावावस्थेला फुटलेली वाणी नाही. ही भाववृत्ती प्रथम अंतर्यामी अंकुरली, रुजली आणि कधीतरी कवितेतून उमलली. म्हणूनच या साध्या पण भाववृत्तीने उजळून निघालेल्या शब्दांत अशी सौम्य पण चिरस्थायी भावगर्भता भरुन राहिली आहे की वाचता वाचता ती आपल्या मनातही झिरपत राहाते, आत सारे सौम्य शीतळ करुन सोडते ! हा संवाद स्वतःचा स्वतःशी, हे स्वगत स्वतःचे स्वतःशी, म्हणूनच एक मंद, हलका, सच्चा सूर या सर्व कवितेला आतूनच लाभला आहे आणि अति नाजूक कोवळे-पणाने (जी कोवळीक कधीच उणावली नाही) व त्याबरोबरच एक भावसमृद्ध जीवन जगण्याच्या क्रियेमधूनच लाभलेल्या परिपक्व प्रौढतेने या कवितांमधून सतत जो प्रत्यय येतो, तो हे काव्य अनुभवणाऱ्या अभिजात सौंदर्यलक्ष्यी आणि अति संवेदनशील मनाचा.

शांत, नितळ पाण्यावर वाऱ्याच्या मंद झुळुकेनेही हलकेहलके तरंग उठावेत, गाईच्यां नितळ पाटीला जरा स्पर्श करताच, त्या नाजूक त्वचेवर संवेदनेच्या इवल्याइवल्या लाटा उठाव्यात, तसे भावतरंग या मनामध्ये उठतात, उठत राहतात. कधी जीवनातील सौंदर्याला, कधी गतकालीन आठवणींना, कधी स्वतःच्याच अंतर्यामी येणाऱ्या प्रचीतीला सामोरे जाताना, आपल्या कवेत हळुवारपणे घेताना; तर कधी एखाद्या उत्कट अनुभवातील आपलीच भावस्थिती स्वगताप्रमाणे स्वतःशीच बोलत सांगताना, निसर्गाशी संवाद करताना, आणि नेहमी केवळ जगण्याची, अस्तित्वाचीच अनुभूती अत्यंत स्वागतशील मनाने घेताना ! "अनेक वेगवेगळया अनुभवांना स्पर्श करूनही, प्रेम हे अनिलांच्या भावजीवनाचे केंद्र कधी बदलले नाही," हे तर खरेच, "असह सौख्याचे घाव" साहण्याचा प्राणांचा ध्यासही सदाचाच, पण आता प्रीतीचा आविष्कार वेगळा आहे. अन्तःकरणाच्या तळाशी, माझ्याशी ती आहे, नेहमीसाठीच आहे, तिच्यातच आता चिरवियोगाची एक न खुपणारी सौम्य शीतल वेदनाही हळुवारपणे मिसळली आहे. आणि फूल दिसत नाही, त्याचा परिमळ मात्र सर्वत्र मंदपणे पसरलेला आहे, सौम्य, गहिरे 'अदनुरे' चांदणेही हलकेच सर्वदूर पसरले आहे. तशी ही प्रीती कितीएक कवितांच्या अंतरंगात तळाशी, कळत नकळत आहे, कवितेच्या भाववृत्तीमध्येच लपलेली आहे. कारण "प्रीतीचा नाही कधि रंग उतरला माझा" हे कवीनेच सांगणे आहे. रात्री अपरात्री एकटेपणी जागताना आभाळातला काळोख कुरवाळताना (किती सुंदर, भाववाही अभिव्यक्ती !) आणि अवेळी गाणाऱ्या कोकिळाला दाद देतानाही या एकाकी

जीवाला साथ करते आहे ती प्रीतीच, " मी गाता तू दिलीस साथ आर्त अंतरिची ' हे कृतज्ञ उद्‌गार उमटतात ते प्रीतीच्याच पोटी; 'आंत ओहटिची माझी मजलाच जाण' हे बोलायला लावते तीही चिरवियोगात व्याकुळलेली प्रीतीच. आणि " ह्या सुकल्या रंगांना आसवांत मिळवुन मी, पहिल्याने पाहियले चित्र तसे काढीन मी ' असे आजही म्हणायला लावते, तीही आसवांत भिजलेली प्रीतीच.

प्रेम आणि निसर्ग ही दोन्ही अनिलांच्या अनुभव क्षेत्राचीच केंद्रे. जीवनाला व्यापून राहिलेल्या एखाद्या जिवलग व्यक्तीसारखीच, इथे निसर्गाशीही नेहमीसाठीच सायुज्यता झालेली; जीवाचे मैत्र जुळलेले. अशा सच्चा अंतर्मुख प्रकृतीच्या कवितेत निसर्ग केवळ रंगतदार पार्श्वभूमीपुरता किंवा वरपांगी अलंकरणापुरता येणे शक्य नाही, हे वेगळे सांगायलाही नकोच. निसर्गाचे श्रेष्ठत्व शिरोधार्य मानून स्वतःला कमी लेखण्याची प्रवृत्तीही या कवितेत आरंभीही कधीच दिसली नव्हती आणि स्वतःची भाववृत्ती शब्दांकित करताना, निसर्गालाच सचेतन रूप देण्याची आवश्यकताही अनिलांना सहसा वाटलेली नाही. निसर्गाशी या मनोवृत्तीचा, या आतल्या मनाचाच नेहमी असा सुसंवाद झालेला असतानाही कवी आणि निसर्ग, एकाच वाक्याच्या दोन स्वतंत्र तारांसारखे वेगवेगळेच राहिले आहेत, आणि तरीही एकरूप आहेत. निसर्गाचे लाघव, त्याची पालटती रूपकला अनिलांनी नेहमीच अशा कौतुकभरल्या प्रेमाने पाहिली आहे की, डोळ्यांत आणि अन्तकरणात उमटलेल्या त्या चित्रांत स्वतःच्या भाववृत्तीचे रंग मिसळावेसेही त्यांना वाटत नाहीत. शरदाच्या आरंभी,

> " आभाळ निळे नि ढग पांढरे हवेत आलेला थोडा गारवा
> कोवळी सकाळ, मनमोकळी, धरातळी रंग एक हिरवा "

हे सारे कौतुक न्याहाळताना त्यांचे मन निखळ प्रसन्नतेने भरून जाते अशा वेळी त्या वातावरणातील अणूरेणूचेही भान त्यांना असते, विलक्षण आत्मीयतेनं अगदी अंतरंगांत शिरून ते हे सारे निरखीत आणि जाणत असतात. ते स्पंदन त्यांच्याही हृदयात उमटत असते. तान्ह्या फणसाचा टपोर गर्भ पान-आडोशाला जन्माला येतानाही ते वत्सल मनाने पाहातात आणि अजून कशी कपाशी नाही फुलली, म्हणून काळजी करणारी काळी मातीही त्यांना दिसते, तिचे हृद्‌गतही ते जाणतात. प्रीतीच्या, प्रणयाच्या साऱ्याच रंगांनी सदैव रंगलेला त्यांच्यातला मिष्कील अनुभवी जाणकार कुणाच्यातरी मुखाने शेवंतीला खट्याळपणे सांगतो की, इतक्यात तुझी वेळ आलेली नाही, गवताचे सोने होण्याआधीच पिवळ्या फुलांची घाई करू नकोस ! बाहेर श्रावण-झड पडत असते, विजलेला लांब दिवस चिंबचिंब होत ओसरत असतो, आणि अंतर्यामी गाढ भिजलेला कवी त्या संमोहन निद्रेमध्ये शब्दांना जाग येण्याची वाट पाहत असतो. अनिलांनीच सांगितल्याप्रमाणे, हे एका निर्मितिपूर्व, आत्ममग्न मनोवस्थेचे चित्रण

आहे. अंधाराच्या आणि प्रकाशाच्या सीमेवरचे रेंगाळते क्षण असावेत, पाखरांनाही वाणी फुटलेली नसावी आणि सारेच निःस्तब्धपणे एका भरल्या क्षणापाशी येऊन टेपलेले असावे तशी ही भरलेली अवस्था. या निर्मितिपूर्व अवस्थेतच 'संमोहन' जीवाला असे विलगलेले, की त्यातून माथं वर काढून प्रत्यक्ष सृजनाच्या, निर्मितीच्या अनुभवालाही सामोरे जायला मन तयार होत नाही. इच्छा असो वा नसो, हा कलाकृतीचा, निर्मितीचा गर्भ तर उदरात चळवळत असतो, बाहेर येण्याची वाट पहात असतो...पण भीती वाटते, पहिलटकरणीसारखीच प्रसवाची भीती वाटते...

"अनवांछित गर्भाचे दिवस असे भरलेले
मन पहिलटकरणीसम प्रसवाला भ्यालेले...

वाटते, हे बाहेर कसे पडेल? याचे रूप मनोमन कल्पिले व वांछिले तसेच असेल का? मग सारेच आठवू लागते. अभिसाराचे साहस, टवटवलेली कांती, एकांती अवघडलेली विश्रांती...आणि अखेर जाणवते की,

'उदरातिल नाजुकशा लाथेने जगलेले
वैभव हे सृजनाचे दैवाने ढगलेले!"

कधीकधी निर्मितीचा क्षण जवळ येऊन टेपतो. 'सूरांतून शब्दांचे स्रोत' जणू वाहू लागतात. वाटते, आता जवळ आले, पण एकाएकी सारेच उलटेपालटे होते! गतार्थ होतात सारेच शब्द आणि उरते वाचा नुसतीच.

विवस्त्र क्लेशांना अंगे झाकण्यास मिळत नाहीत वैखरीचे वेष
वाणीचा जन्मच होण्यापूर्वीचा घुमतो केवळ वेदनांचा घोष.

—पण या वेदनेलाही उःशाप असतो, भयव्याकुळ अंतःकरणालाही साथ मिळते, ती 'आर्त अंतरीची!' आणि शब्दांचे ऋण फिटून अर्थाचेही देणे दिल्यानंतरची, त्यापलीकडची ती साथ असते!

निर्मितिपूर्व अवस्थेची, सौंदर्यास्वादाची आणि प्रत्यक्ष सृजनाची ही अनुभूती, त्यातील व्यथावेदना, 'ॲगनी' आणि 'एक्सटसी', सारीच आजवर कित्येक प्रतिभावंतांनी मनोमन अनुभवलेली; पण त्याची ही अशी अभिव्यक्ती आजवर मराठी कवितेत झाली नव्हती. हे असे चिंतन आजवर काव्यरूप पावले नव्हते. 'वेदनांचे हे घोष' अनुभवतानाच त्यांना असे सौंदर्यरूप लाभले नव्हते. अशी ही सत्त्वसंपन्न, भावसमृद्ध कविता. पुनःपुन्हा वाचायला लावणारी, वाचतावाचताच चिंतनशील करणारी, प्रचीतीची खूण पटवणारी, नकळतेही सांगणारी, सारे मनःपूर्वक वाचत असतानाच मनावर एक मुद्रा उमटते ती प्रीतीच्या रंगात सदैव रंगलेल्या एका प्रेमिकाची. "कधी न वाटली झाली रिती, रिती भरतीवरती भरतीच आली' या सफल अनुभूतीनंतर आता वियोगातील एकटेपण साहतानाही अंतर्यामी कोणतेच गाऱ्हाणे

नाही, कधी कधी केवळ एक उदास विस्मय तेवढा दाटून येतो आणि स्वतःशीच म्हणतो, ”

किती़क काळ हालला असा तुझ्याविना
कळे न श्वास चालला कसा तुझ्याविना
तमामधुन सावकाश उजळे आकाश निळे
चळे उदास चंद्रमा कसा तुझ्याविना।
ताऱ्यांचा धरून भार रात्रिस उरते न त्राण
स्मरणावर प्राण जळे कसा तुझ्याविना...

ही प्रीती मोटी. जीवनालाच कवेत घेणारी. लावण्यमय करणारी. तिच्या अनंत छटांनी ही दशपदी अशी समृद्ध झाली आहे की, अनिलांच्या चिंतनशील पक्व प्रतिभेचे हे देणे किती घेऊ आणि किती नको या कृतज्ञ जाणिवेने मन भारावून जाते, भारावलेले राहाते.

‘**दशपदी**’ ...अनिल ( आत्माराम रावजी देशपांडे ) / मौज प्रकाशन, मुंबई ४ / पहिली आवृत्ती / सप्टेंबर १९७६ / पृष्ठे ९५ / ‘दशपदी—दर्शन : अनिल’ ( पृष्ठे ७ ते २३ ) व ‘पदचर्या—विजया राजाध्यक्ष’ ( पृष्ठे २४ ते ५० ) या प्रास्ताविकांसह /

* * *

**एक आत्मा जाण**

मांग—आर्यामध्ये पाहू जातां खूण।
एक आत्मा जाण। दोघांमध्यें ।।
दोघेही सारीखे सर्व खाती पिती।
इच्छा ती भोगीती। सारखेच ।।
मांग आर्य दोघे शोभा मानवांत।
दोघे वर्तनांत। एकसहा ।।
सर्व ज्ञानामध्ये आत्मज्ञान श्रेष्ठ।
कोणी नाही भ्रष्ट। जोती म्हणे ।।

— महात्मा जोतिबा फुले

( म. फुले समग्र वाङ्मय, संपा. कीर व मालशे, १९६९, पृ. ४५७. )

अनुक्रमणिका

# १३

## के. नारायण काळे यांची समीक्षा

### ग्रंथसमीक्षक : शकुंतला रघुनाथ लिमये

गेल्या पन्नास वर्षांतील सतत वाचन, व्यासंग व चिंतन यांतून जे विपुल लेखन कै. के. नारायण काळे यांनी केले, त्यातील काही निवडक लेख 'प्रतिमा : रूप आणि रंग' या पुस्तकात संकलित केलेले आहेत. डॉ. वि भा. देशपांडे यांचे हे सुजाण संपादन. नाटक, चित्रपट व कला-समीक्षा हे काळ्यांच्या अभ्यासाचे खास विषय होत. या संग्रहातील अनेक लेख त्यांच्या संशोधनात्मक, चिकित्सक व कुशाग्र बुद्धिमत्तेची साक्ष देतात. भाषेचा ओज आणि प्रभाव हे काळे यांच्या लेखणीचे सामर्थ्य होय. त्यामुळे वाचक हा त्याखाली थोडासा दडपला जातो. मुख्यत्वेकरून पाश्चात्त्य कलातत्त्वांचा आणि कलाज्ञानाचा परिचय करून देताना त्यांची लेखणी विशेष वजनदार व संस्कृतप्रचुर असे रूप धारण करते.

या पुस्तकातील पहिला लेख आहे. 'मराठी रंगभूमी : प्रथा आणि परंपरा.' या विषयाचा मागोवा घेताना ग्रंथकाराने मराठी रंगभूमीच्या गेल्या शे सवाशे वर्षांतील वाटचालीचा थोडक्यात इतिहासच लिहिला आहे. काळे आण्णासाहेब किर्लोस्करांना युगप्रवर्तक मानीत नाहीत. आण्णासाहेबांनी संगीत नाटके लिहिली. ही घटना म्हणजे ऐतिहासिक विकासक्रमाचा एक दाखला आहे असे काळे म्हणतात. परंतु याच लेखात पुढे 'सर्वांगसुविहित-तंत्राचा नाट्यप्रयोग' हे 'नाट्यमन्वंतरा'ने रंगभूमीला दिलेले देणे होय' असा दावा ते हिरीरीने मांडतात. वास्तविक 'नाट्यमन्वंतर'पूर्वी पार्श्वनाथ आळतेकर यांच्या नेतृत्वाखाली रेडिओ स्टार्स'ने सादर केलेले सहजसुंदर अभिनय-पद्धतीचे 'मैत्री,' 'पांचाळी' वगैरे नाटकांचे प्रयोग 'सर्वांगसुविहित' असेच झाले होते, व ते भरपूर गाजलेही होते. तत्पूर्वी बाबूराव पेंढारकर यांनीही 'सुविहित' प्रयोगाची वाटचाल सुरू केलीच होती. त्यांच्या 'ललितकलादर्श'चे प्रयोग त्या काळी लोकप्रिय ठरले होते. श्री. वर्तक यांच्या नेतृत्वाखाली चालणाऱ्या 'नाट्यमन्वंतर' या संस्थेजवळ भरपूर भांडवल होते. केशवराव दाते व अण्णासाहेब कारखानीस यांच्या जुन्या व प्रभावी रंगभूमीचे सामर्थ्य आणि पुण्याई त्यांच्या पाठीशी होती. सुस्थित व प्रतिष्ठित स्त्रियांचे या रंगभूमीवर पदार्पण झाल्यामुळे, तसेच मुलाखती, लेख, जाहिराती आदी प्रसिद्धीतंत्रांचा भरपूर वापर झाल्याने 'नाट्यमन्वंतर'चा गाजावाजा

विशेष झाला. रंगभूमीच्या पाळ्यातून प्रकाशयोजना आणि वाद्यवृंदाची बैठक हे या संस्थेने अमलात आणलेले विशेष असे प्रकार होत. त्याच वेळी मुंबईत गाजत असलेल्या ' एमिल झोला ' या चित्रपटाची आठवण करून देणारा, काळे यांचे ' आंधळ्यांची शाळा 'मधील अभिनय पाहून प्रेक्षक भारावून जात. परंतु कालांतराने या संस्थेला वर्तकांचे ' लपंडाव ' हे सामान्य नाटक व ताम्हणकरांचे ' उसना नवरा ' हे हलकेफुलके नाटक या कृतींचा आश्रय घ्यावा लागला व जनाभिरुचीला शरण जावे लागले.

याच लेखात मराठी रंगभूमीच्या संदर्भात आळतेकर यांच्या ' लिट्ल थिएटर्स '-चाही उल्लेख राहून गेला आहे. आणखी एका चळवळीचाही उल्लेख काळे यांच्या या लेखात करावयाचा राहून गेलेला दिसतो. १९५१ साली स्थापन झालेली ' पीपल्स थिएटर ' ही संस्था, ' दादा ' हे कामगारांसाठी लिहिलेले नाटक मैदानात फुकट दाखवीत असे. बहुजनसमाजाकरिता सुरू केलेली रंगभूमीवरची ही एक विशेष चळवळ रंगभूमीच्या प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वाची होय. या संस्थेबद्दल ज्येष्ठ पत्रकार पां. वा. गाडगीळ यांनी ' लोकमान्या 'त अग्रलेख लिहून या चळवळीची प्रशंसा केली. रांगणेकर यांच्या ' नाट्यनिकेतन ' या संस्थेनेही अनेक सुविहित नाट्यप्रयोगाचे दर्शन रसिकांना दीर्घकाल घडवले आहे. अभ्यासकांकरिता या उणिवा नमूद करणे जरूर आहे.

मराठी रंगभूमीच्या इतिहासात स्त्रीपार्ट्यांची दखल घेताना काळे यांनी वामनराव पुरोहित यांच्या आत्मनिवेदनातील मजकुराचा उल्लेख केला आहे. वास्तविक पुरोहितांनी काही नटांच्या विकृत व गलिच्छ सवयींबाबत लिहिले आहे. काही व्यक्तींची ती विकृती असेल, पण ती काही रंगभूमीची प्रथा व परंपरा नाही. या ग्रंथाचे संपादन करताना हा भाग टाळता आला असता तर योग्य ठरले असते.

नाट्यप्रयोगाशी संबंधित असलेल्या धूप, दीप, हार, नारळ आदी रूढ संकेता-संबंधी काळे थोडे उपहासानेच लिहितात. परंतु प्रत्यक्ष प्रयोग सुरू होण्यापूर्वी शांत वातावरण निर्माण व्हावे, प्रेक्षकांच्या चित्तवृत्ती प्रसन्न असाव्यात, या दृष्टीने ही पद्धती रूढ आहे. मंगलाचरणातून क्षणभर चिंतन घडते, मनाला स्थैर्य व धैर्य मिळते. परदेशातही हळुवार संगीताचे सूर प्रारंभी छेडले जातात ते याच मूळ हेतूने. तेव्हा या प्रथेत गैर असे काही म्हणता येत नाही.

रंगभूमीचा व्यवसाय विकसित व्हावा अशी काळे यांची उत्कट तळमळ दिसते. परंतु या व्यवसायाचे स्वरूप कसे असावे, यासंबंधीचे विवेचन प्रस्तुत निबंधातून आढळत नाही. श्री. काळे यांनी आपल्या लेखांतून हौशी नटवर्गाला रंगभूमी तारण्याचे श्रेय दिले आहे. खरे पाहिले तर हेतुप्रधान अशी हौशी रंगभूमीची चळवळ अस्तित्वात नाही. पुण्यात दोनतीन, नागपूरला एखादी-दुसरी व मुंबईतही एखादी-दुसरीच, यापलीकडे हौशी नाट्यसंस्थांचे सतत असे कार्य नाही. स्पर्धांच्या निमित्ताने एकत्रित

संख्येने नाट्यप्रयोग मिळणे यावर मूल्यमापन करणे बरोबर नाही. एकांकिकांचे प्रयोग भरपूर होत आहेत, तेही स्पर्धांच्या निमित्तानेच. या तात्कालिक प्रयोगांची पुनरावृत्ती फारशी होत नाही. शिवाय हौशी म्हणून गाजत असलेल्या नाट्यमंडळ्यांतील कलावंत इतरत्र नोकऱ्या करतात आणि रंगभूमीवर भरपूर मानधनही घेतात. म्हणजे ते अर्ध-व्यवसायीय. या वस्तुस्थितीचाही विचार होणे जरूर आहे.

'रंगभूमी' या लेखात काळे यांनी जागतिक रंगभूमीबाबत मराठी वाचकांना बरीचशी माहिती उपलब्ध करून दिली आहे. अभिनय, नाट्यप्रयोग, नट आणि नाट्य या लेखांतून स्टेनिस्लाव्हस्की याने विकसित केलेल्या मानसतांत्रिक अभिनय-पद्धतीचा उल्लेख काळे यांनी केला आहे; आणि त्याचा पुरस्कारही केला आहे. तसेच गॉर्डन क्रेग याच्या प्रयोगनिर्मितीच्या तंत्रालाही बरेच महत्त्व त्यांनी दिले आहे. गॉर्डन क्रेग हा स्वतः उत्तम नट होता, श्रेष्ठ नेपथ्य संयोजक होता. त्याने नटाला लेखकाच्या 'शब्दा'तून मुक्त करण्याचा प्रयत्न केला. नेपथ्यविषयक प्रगत तंत्राने रंगमंच आकर्षक व अर्थवाही करून उत्कृष्ट नटाच्या अभिनयाला पूरक अशी साथ देण्याचा त्याने उपक्रम केला. याचा परिणाम असा झाला की, निर्मितीतंत्रच वरचढ ठरले; आणि नट व अभिनय फिके पडत गेले. आज आपल्याकडेही रंगमंच केवळ प्रयोग-तंत्राच्या अधिक आहारी गेलेला दिसतो. या गोष्टीचीही नोंद घ्यावयास हवी.

स्वातंत्र्यानंतर राज्यशासनाच्या सहकार्याने मराठी रंगभूमीने फार प्रगती केली आहे, असे काळे म्हणतात. सरकारी नाट्यस्पर्धा, नाट्यशिक्षणाचे वर्ग, अनुदाने, नाट्यमहोत्सव यामुळे मराठी रंगभूमीची मोठीच प्रगती झाली असे ते म्हणतात. वास्तविक सरकारी नाट्यशिक्षणवर्ग व नाट्यशिक्षणशिबिरे सुरू होण्यापूर्वी दोन वर्षे व दिल्लीला नाट्यशिक्षणशाळा सुरू होण्यापूर्वी एक वर्ष ही चळवळ महाराष्ट्रात सुरू झालीच होती. गावोगावी ही नाट्यशिक्षणशिबिरे विनामूल्य भरवण्यात आली होती. कै. केशवराव दाते यांचा या चळवळीस आशीर्वाद होता. महाराष्ट्रात व महाराष्ट्रा-बाहेर सुमारे साठ नाट्यशिक्षणशिबिरे झाली आहेत. महाराष्ट्र नाट्यविद्यालयाचे हे कार्य काळे यांच्या कुशाग्र नजरेतून निसटलेले दिसते. यांतल्या काही शिबिरांत समारोपसमारंभाचे पाहुणे वा अध्यक्ष म्हणून काळे यांनी भाषणेही केली आहेत. अभ्यासकांच्या माहितीसाठी हा उल्लेख होणे जरूर आहे.

मराठी रंगभूमीवरील शृंगाराच्या मर्यादा विशद करताना काळे म्हणतात, "इंग्रजी अनुवादित नाटकांतील प्रणय प्रामुख्याने 'आंगिक अभिनया'तून व्यक्त होई, तर संस्कृत नाटकातील शृंगार शब्दांच्या साह्याने, वाचिक अभिनयद्वारा प्रगट होत असे. वास्तविक अभिनय हा एकजिनसी असला पाहिजे. ( आंगिक, वाचिक आणि सात्त्विक अभिनय प्रकारांचा संयोग झाला पाहिजे. ) तेव्हा वाचिक आणि आंगिक अभिनयाची फारकत करण्याचे काहीच कारण नाही.

अनुक्रमणिका

मराठी रंगभूमीच्या प्रारंभीच्या काळात कथा, पुराणे व कीर्तने-प्रवचने यांतून मनोरंजनाच्या मिषाने प्रणयप्रकारांचे व कामलीलांचे रसाळ वर्णन श्रोत्यांना ऐकवण्यात येत असे, असे काळे यांचे म्हणणे आहे. परंतु इतिहासाची साक्ष थोडी निराळी आहे. उत्तान शृंगार-प्रदर्शनाला व कामुक शृंगारिक चर्चेला मराठी सदभिरुचीने विरोधच केला आहे. १७६० नंतर शास्त्रीमंडळींच्या नाटकांतून अमर्याद शृंगारांचे दर्शन घडविण्याचे प्रकार घडत हे खरे आहे. १८७० पर्यंत याचा जाहीर निषेधही कुठे झाल्याचे आढळत नाही. परंतु पुढे प्रेक्षकांच्या सदभिरुचीनेच या प्रकारांना आळा घातला. आण्णासाहेब किर्लोस्करांनाही 'सौभद्रा'तील शृंगारिक प्रवेश एका पदातच आवरता घ्यावा लागला. प्रेक्षकांच्या सदभिरुचीवरच मराठी रंगभूमीवरच्या शृंगाराच्या मर्यादा ठरवल्या जात व पारखल्या जात. ज्या ज्या वेळी या मर्यादांचे उल्लंघन झाले, त्या त्या वेळी टीकेचा आवाज उठला. १९३२ साली विश्राम बेडेकर यांनी लिहिलेल्या 'ब्रह्मकुमारी' या नाटकाच्या दुसऱ्या अंकातील प्रवेश आक्षेपार्ह ठरल्याने, रंगभूमीवर तो गाळावा लागे, असे लेखकच प्रस्तावनेत सांगतात.

सामाजिक संदर्भात रंगभूमीवरील शृंगाराच्या मर्यादांविषयी काही मूलग्राही विचार या ग्रंथात वाचायला मिळतील अशी अपेक्षा होती. पण त्याविषयी जी चर्चा येथे करण्यात आली आहे, ती ढोबळ स्वरूपाची वाटते. शृंगार आणि सामाजिक जबाबदारी या मुद्यांवर अधिक विवेचन झाले असते तर चालू घडीला ते अधिकच उपयुक्त ठरले असते. काळे यांना संयमित शृंगार व त्याचा आविष्कार मान्य आहे एवढाच धागा हाती लागतो.

'नाट्यवाचन-नाट्यछटा' या लेखातील विवेचन मूलगामी व सुश्लिष्ट उतरले आहे. वाचकाचा आवाज हेच नाट्यवाचन या माध्यमाचे प्रगटनसाधन राहिले पाहिजे, व ते जास्तीत जास्त आविष्कारक्षम करण्यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे, ही काळे यांची सूचना महत्त्वाची आहे. नाट्यसाहित्याची हानी भरून काढण्यासाठी, त्यात सकस निर्मितीची भर पाडण्यासाठी नाट्यवाचन या कला-माध्यमाचा प्रसार व्हायला पाहिजे, हा महत्त्वाचा मुद्दा त्यांनी आवर्जून मांडला आहे.

'चित्रपट आणि कला,' 'चित्रपट-निर्मिती' व 'चित्रपटनिर्मिति, टीकाकार आणि प्रेक्षक' हे तिन्ही निबंध चित्रपटकलेसंबंधाने असून ते अभ्यासपूर्ण वाटतात. चित्रपटकलेचे गुणधर्म सांगून चित्रपटनिर्मितीची सांगोपांग माहिती काळे देतात. विशेष म्हणजे चित्रपटनिर्मितीच्या सर्व प्रक्रियांबाबत यच्चयावत इंग्रजी शब्दांना त्यांनी मराठीत सुंदर प्रतिशब्द योजले आहेत. चित्रपटनिर्मितीत ज्यांना आस्था आहे, अशा जिज्ञासूंना हे लेख उत्तम मार्गदर्शक ठरतील. पूर्णतः तांत्रिक स्वरूपाच्या या लेखामध्ये क्वचित बोजड शब्दयोजना झाल्याचे दिसते. तसेच हव्या त्या पारिभाषिक संज्ञा नसल्याने नवे शब्द बनविताना काही स्थळी जटिलता आली आहे.

अनुक्रमणिका

या संग्रहातील विविध निबंध काळे यांनी वेगवेगळ्या 'मूड्स'मध्ये लिहिले आहेत. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथाचे स्वरूप एकसूत्री व सलग वाटत नाही. मुद्रणदोषही फार राहिले आहेत. मात्र मराठी नाट्यकलेचा विकासपट विशद करणारा एक मौलिक समीक्षा-ग्रंथ म्हणून के. नारायण काळे यांचा प्रस्तुत ग्रंथ लक्षणीय ठरेल.

**'प्रतिमा : रूप आणि रंग'**

लेखक : के. नारायण काळे, संपा : वि. भा. देशपांडे, नूतन प्रकाशन, पुणे ३०.
पहिली आवृत्ती, १९७६
पृष्ठे डेमी १५२, मूल्य रु. १७ – ५०

* * *

**पुढल्या आकांक्षा किती सांगाव्या ?**

जागजागी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शाखा निघाव्या. ठिकठिकाणच्या लहानमोठ्या साहित्य-संस्था संलग्न करून घ्याव्या. सालोसाल 'गुजरात व्हर्नॅक्युलर सोसायटी' काढते त्या प्रकारची वार्षिक वाङ्मय-समालोचने प्रसिद्ध करावी. प्रादेशिक संमेलने सुसंघटित करून परिषदेच्या एकसूत्रात त्यांस गोवून घ्यावी. स्थिर निधीत भर टाकावी. नवी उपयुक्त प्रकाशने करावी व करवावी. मराठी भाषेच्या शिक्षणाची सतत वाढ कशी होईल म्हणून योजना आखाव्या. मराठीवरील अन्याय्य आक्रमणास पायबंद घालावा. लोकव्यवहारात मराठीचा प्रसार आणि मान वाढवावा. सरकार आणि विद्यापीठे यांवर वजन पाडून मराठीचे पाऊल पुढे पडेल म्हणून यत्न करावे. समानहेतुक देशी साहित्य-संस्थांशी सहकार करावा. महाराष्ट्रातच मराठीचे अखंड आणि अनिरुद्ध साम्राज्य स्थापण्यासाठी सर्वस्व वेचण्यास महाराष्ट्रीयांस प्रवृत्त करावे. 'मराठी बोलणारा तो मराठा' ही ऐक्यभावना वाढीस लावावी, आणि भारताचा समुद्धार करून नवयुग निर्माण करण्यास अभिमुख व्हावे.

—याहून निराळ्या आकांक्षा त्या काय सांगाव्या ?

—दत्तो वामन पोतदार

# १४

## नागपुरी बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास

### ग्रंथसमीक्षक : मीना भालचंद्र जोशी

'नागपुरी बोली : भाषाशास्त्रीय अभ्यास' हा १९७२ साली प्रकाशित झालेला प्रा. वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे यांचा प्रबंधग्रंथ होय. प्रा. वऱ्हाडपांडे हे नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजमध्ये मराठी विभागप्रमुख असून त्यांच्या या ग्रंथामुळे गेल्या वर्षी त्यांना नागपूर विद्यापीठाची मराठी विषयातील पीएच. डी. ही पदवी बहाल करण्यात आली आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या बत्तीस पृष्ठांच्या प्रास्ताविकात भाषा व बोली यांचे स्वरूप, बोलीच्या अध्ययनाची आवश्यकता, नागपुरी बोलीची क्षेत्रमर्यादा, तिची प्राचीनता व प्रबंधाचे आधारभूत साहित्य इत्यादी विषयांचे विवेचन केले आहे. प्रास्ताविकाप्रमाणेच प्रबंधाच्या शेवटीही नागपुरी व वऱ्हाडी या दोन बोलींसंबंधीचे विवेचन करून नागपुरी ही वऱ्हाडीची स्थानभेदस्वरूप उपशाखा नसून तिच्याहून वेगळी अशी मराठीची बोली असल्याचे लेखकाने साधार स्पष्ट केले आहे. 'महाबळ' हे लेखकाचे जन्मगाव. तेथील अशिक्षित बहुजनसमाजाच्या बोलभाषेच्या जवळजवळ सतरा विज्ञापकांकडून (इन्फर्मन्टस) त्यांच्याही नकळत जमा केलेल्या तपशिलाचा उपयोग प्रस्तुत भाषा-विश्लेषणाकरिता करण्यात आला आहे. कोणत्याही बोलीतील आघात-प्रवृत्ती मूळ भाषेपासून थोडीफार स्वतंत्र असू शकते; त्या दृष्टीने ग्रंथातील आघातविचार प्रकरणही औचित्यपूर्ण वाटते. ध्वनिविचार, रूपविचार, शब्दविचार, वाक्प्रयोग आणि वाक्य-रचना, अन्यभाषासंपर्क इ. अंगांचा विचार ग्रंथात क्रमशः एकेका प्रकरणात सादर केला आहे. शेवटी नागपुरीचे भाषिक नमुने व शब्दकोश जोडला आहे. आधारभूत अशा या दोन प्रकारच्या साहित्याचा समावेशही बोलीच्या अभ्यासात अटळच ठरतो. किंबहुना, ग्रंथात मांडल्या गेलेल्या निर्णयातील सत्य पारखून घेण्यास भाषिक नमुने खूपच उपयुक्त ठरतात. शब्दसंग्रहाने तर बोलीचे वेगळेपण नेटकेपणाने डोळ्यांपुढे उभे राहू शकते.

इतर लेखनाच्या मानाने 'भाषाशास्त्र' या विषयावरील लेखन मराठीत कमी आहे. त्यातही तिच्या बोलींच्या भाषाशास्त्रीय अभ्यासाचे लेखन आणखीच विरळ. गेल्या दहा बारा वर्षांत डॉ. अ. म. घाटगे यांची मराठीच्या काही बोलींसंबंधीची पुस्तके या

अनुक्रमणिका

संदर्भात उल्लेखिता आली तरी त्यांचे लेखन इंग्रजीत झालेले आहे. अलीकडे काही वर्षांत डॉक्टरेट पदवीच्या अभ्यासासाठी काही बोलींवर झालेल्या लेखनातील काहींचे लेखन इंग्रजीतच असून त्यांपैकी बरेच प्रबंध अद्याप अप्रकाशित आहेत. महाराष्ट्रातील विविध विद्यापीठांतून मराठीच्या बोलींचे ज्ञान मराठीच्या अभ्यासाच्या संदर्भात अपेक्षिले जाते. या सर्व पार्श्वभूमीचा विचार लक्षात घेता मराठीच्या एका महत्त्वाच्या बोलीवरील या प्रदीर्घ लेखनप्रयत्नाला उपयुक्ततेचे महत्त्व निर्माण होते. या प्रकारच्या ग्रंथांचा वाचकवर्ग मर्यादित असला, तरी असतो मात्र साक्षेपी, अभ्यासू व जाणकार; म्हणूनच प्रस्तुत ग्रंथाचा स्थूल परिचय आरंभी करून दिला असला तरी त्यातील काही त्रुटी व त्याचे अंतःस्वरूप यांविषयी दोन–चार मुद्द्यांचे विवरण करणे येथे अप्रस्तुत ठरू नये.

बोलीच्या भाषाशास्त्रीय अभ्यासात प्रामुख्याने वर्णनात्मक अभ्यासाची ( डिस्क्रिप्टिव्ह स्टडी ) अपेक्षा असते. उपलब्ध तपशिलाचे पृथक्करण करून त्या बोलीचे व्याकरणस्वरूप मांडणे हा वर्णनात्मक अभ्यासाचा मार्ग. ज्या भाषेची बोली अभ्यासात प्रस्तुत असते त्या भाषेच्या व्याकरणाचे पूर्वज्ञान वाचकांकडून अपेक्षित समजले जाते; त्यामुळे बोलीसंबंधींच्या हरेक मुद्द्याच्या विवरणाच्या ठायी ग्रांथिक मराठी व नागपुरी बोली अशा तुलनास्वरूपाने लेखनप्रपंच अकारण वाढल्याची जाणीव ग्रंथात अनेक ठिकाणी होते. कोणत्याही दोन गोष्टींतील साम्यवैषम्य तुलनेने स्पष्टपणे प्रतीत होत असते हे खरे असले, तरी या प्रकारच्या शोधनिबंधग्रंथात ते अनावश्यक विस्तारान्वितच ठरते; हे एक.

दुसरे असे की, ग्रांथिक भाषा व बोली यांच्या तुलनास्वरूप लिहिण्याप्रमाणे विविध मुद्द्यांच्या विवरणाच्या निमित्ताने या ग्रंथात ऐतिहासिक व्युत्पत्तीचाही समावेश ठिक-ठिकाणी झाला आहे. बोलीच्या अभ्यासातील प्रमुख टरणाऱ्या स्थलविषयक स्तराला या व्युत्पत्तीलेखनामुळे कालविषयक स्तर व परिमाण लाभते. भाषेप्रमाणेच दरेक बोलीलाही इतिहास असतो. त्यातल्या त्यात प्राचीन काळापासून महत्त्वाने नांदत असलेल्या बोलींना तर तो असतोच असतो. हे जरी खरे असले तरी अधूनमधून त्याच्या यथातथ्य वर्णनाला ऐतिहासिक चर्चेचे जोडलेले रूप असत्य नसले तरी व्यवधानक ठरते. त्यातून त्यातील पुष्कळशी चर्चा नागपुरी बोलीलाच लागू ठरणारी नसून ग्रांथिक मराठीला सर्वसामान्यपणे लागू पडणारी असल्याने तीही विस्ताररूपच वाटते.

ध्वनिविचार हा स्वरप्रक्रिया व व्यंजनप्रक्रिया अशा दोन भागांत सविस्तर सादर केला असून दोन्हींच्या शेवटी साररूपाने दिलेले त्यांविषयींचे निष्कर्ष नागपुरीचे स्वर व तिची व्यंजने लक्षात आणून देण्यास साहाय्यक ठरतात. परंतु प्रत्येक स्वर व व्यंजन यांच्या बाबतीतील ऐतिहासिक पार्श्वभूमी ग्रांथिक मराठीचे वर्णन करणारी आहे हे या वरील मुद्द्याचे उदाहरण होय.

हेच थोड्याफार प्रमाणात तालिकांविषयी म्हणता येईल. ग्रांथिक मराठी व नागपुरी या दोन्हींतील काही गोष्टी लेखक तालिकांनी स्पष्ट करतो. हेही तंत्र दृश्य परिणामाकरिता उपयुक्त ठरणारे असले तरी लेखकाने त्याचा वापर सर्वच व्याकरणविशेषांच्या करिता केला असता तर त्यात एकवाक्यता जाणवली असती. परंतु उदाहरणच द्यावयाचे तर क्रियापदविचारात वर्तमान, भूत या काळाच्या प्रत्ययांच्या विवेचनात ग्रांथिक भाषेतील व बोलीतील प्रत्ययांची तालिका दिली असून भविष्यकाळ, आज्ञार्थ, विध्यर्थ इ. चे विवेचन मात्र एकेरीपणे फक्त नागपुरीचेच केले आहे. लेखनातील हे दुहेरी धोरण वाचकाच्या मनावर स्पष्ट परिणाम करू शकत नाही.

रूपविचारविभागात नाम, सर्वनाम, विशेषण इ. च्या विचार केलेल्या वेगवेगळ्या प्रकरणांच्या शेवटी त्यांचे विशेष साररूपाने दिले असते तर ते नेमके ठरले असते.

काही विशेषणात्मक प्रत्यय आणि उपसर्ग ( पृ. २२४ ते २२५ ) यांचे विवेचन शब्दसिद्धीच्या विचारात मोडत असल्याने शब्दविचार प्रकरणात समाविष्ट करणे अधिक श्रेयस्कर ठरले असते.

तसेच शब्दविचारात प्रत्ययघटित शब्दविवरणात प्रत्यय देताना अक, अड, अन, एल, काड इ. प्रत्ययातील शेवटच्या व्यंजनाचे पाय मोडलेले नाहीत. त्यांच्यापुढे दिलेल्या उदाहरणादाखलच्या शब्दांतील शेवटच्या व्यंजनाचे मात्र पायमोडके लेखन केले आहे. ' आइ ' या ऱ्हस्वान्त प्रत्ययापुढेही ' आई ' या दीर्घान्त दर्शक शब्दांची उदाहरणे दिली आहेत. ( पृ. २७१ ). पृ. २७२ वर ग, म आणि व असे एकाक्षरी प्रत्यय देऊन उदाहरणांत मात्र त्यांच्यापुढे लिंगवचनाचे प्रत्यय लागून झालेली रूपे दिली आहेत. उदा. ग—पोरगं, बुड्गी. र—बुद्रा, टुत्री.

दोषदर्शनार्थ म्हणून नव्हे, परंतु शास्त्रीय ग्रंथातील अशास्त्रीयता अधिक बोचरी ठरते एवढ्याचसाठी वर काही दोषस्थळांचा उल्लेख केला. शोधनिबंधलेखनात स्वसंशोधित तपशिलाबरोबरच विषयाच्या शास्त्रशुद्ध मांडणीला महत्त्व असते हे सर्वमान्य आहे.

प्रस्तुत ग्रंथातील विवेचनात काही ठिकाणी ही शास्त्रशुद्धता आढळत असली तरी तळटिपांच्या बाबतीतील तिचे विपरीतपणही उल्लेखिण्याजोगे आहे.

संदर्भ अचूक असला तरी त्याची शिथिलपणे केलेली नोंद दोषपात्रच ठरते. या शिथिलतेचे विविध प्रकार काही प्रमाणात या ग्रंथात आढळतात, त्यांपैकी काहींचा वानगीदाखल पुढीलप्रमाणे निर्देश करता येईल.

( १ ) मूळ मजकुरात समाविष्ट करता येण्यासारखा व तेथेच तो अधिक योग्य दिसला असता असा मजकूर संदर्भग्रंथाच्या तळटीपांतील निर्देशांच्या पुढे लिहिला आहे.

( २ ) लेखकनाम, ग्रंथनाम, प्रकाशनस्थळ, काळ, आवृत्ती इ. तपशील देण्यात बरीच अनागोंदी आढळते. त्याबाबत तथाकथित रूढ क्रम स्वीकारला नाही तरी

कोणताही क्रम होईना, परंतु निश्चित असा एक क्रम आवश्यकच ठरतो. असा कोणताही क्रम काटेकोरपणाने न पाळल्याने याविषयी पुढीलप्रकारचे वैचित्र्य निर्माण झाले आहे: ( अ ) लेखकाच्या नावापूर्वी मराठीत ' लेखक ' असा तर इंग्रजीत by असा अकारण उल्लेख, ( ब ) काही ठिकाणी आद्याक्षरांव्यतिरिक्त केवळ आडनावाच्या उल्लेखाने लेखकनामाचा निर्देश, ( उदा. Jesperson ) तसेच, ( क ) डॉ. सारख्या उपाधींची लेखकनामापूर्वी अनावश्यक नोंद, ( ड ) पृष्ठातील मूळ मजकुरात लेखकाचे नाव दिल्याने तळटीपेत फक्त ग्रंथनामच उल्लेखिणे, ( इ ) काही ठिकाणी ' पहा ' या शब्दाची अनावश्यक सूचना. ( फ ) पृ. १८ वर Linguistic Survey of India (Vol VII), P. 248. असा उल्लेख आल्यानंतरचे पुढील पाच संदर्भ त्याच ग्रंथातील असूनही त्यांच्या नोंदीकरता तीन वेळा LSOI असे संक्षेपरूप ( या रूपातही O हे अक्षर अनावश्यक आहे हा मुद्दा वेगळाच. ) वापरून चौथ्या वेळी मात्र ' कित्ता ' असे लेखन करणे ( वस्तुतः वरील सर्वच ठिकाणी ' कित्ता ' असे लेखन अपेक्षित आहे. ) ( ग ) ग्रंथसंक्षेपही वेगवेगळया पद्धतीने देणे. उदा. पृ. ४४, ४६ वर ' मराठी वर्णोच्चार विकास ' या ग्रंथाचे म. व. वि. हे संक्षेपरूप, पृ. ७२ वर ते मववि, पृ. ७८ वर म–व–वि., पृ. १०१ वर म–व. वि असे विविध प्रकारे केले आहे. ' यादवकालीन मराठी भाषा 'चे याकाम, ' पेशवे दफ्तरातील मराठी भाषेचे स्वरूपा'चे पेदमभा, ' मराठी भाषा : उद्गम आणि विकासा 'चे मभाउवि इ. संक्षेपातील सलग अक्षर योजनेप्रमाणे ' मववि ' असेच सलग लेखन करणे सोईचे ठरले असते. याविषयींची आणखी एक मौज म्हणजे संक्षेपयोजनेनंतरही त्याच पुस्तकाचे नाव व तेही एकाच पृष्ठावर ( उदा. पृ. ८१ ) पूर्णपणे लिहिण्याचाही उपक्रम करणे, इत्यादी.

या प्रकारच्या दोषांना गौण समजावयाचे की महत्त्वाचे ? एक गोष्ट मात्र निश्चित की, यांसारखे बाह्यदोष सहज दूर करता येण्याजोगते आहेत.

शास्त्रीय विषयांवरील ग्रंथात सर्वच प्रकारचा काटेकोरपणा साक्षेपाने अपेक्षित असता असे छोटे मोठे दोष पचविणे जाणकार वाचकाला तापदायक वाटते.

मांडणीतील शास्त्रीयतेचा अभाव दूर केल्यास नागपुरी बोलीविषयीची परिश्रमपूर्वक सादर केलेली प्रस्तुत ग्रंथातील रूपरेषा अभ्यासकाला उपयुक्त ठरणारी आहे हेही तितकेच खरे. प्रस्तुत प्रबंधग्रंथ लेखकाच्या व्यासंगाचे फलित आहे.

**' नागपुरी बोली : भाषाशास्त्रीय अभ्यास '**

लेखक : डॉ. वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे

प्रकाशक : सौ. वसुमती वऱ्हाडपांडे, ४७३ प्रोफेसर्स कॉलनी, हनुमाननगर, नागपूर–९.

प्रथमावृत्ती, ऑक्टोबर १९७२, पृष्ठे डेमी ३६८, मूल्य पंधरा रुपये.

* * *

अनुक्रमणिका

# १५

## ‘आचार्य अत्रे : साहित्यदर्शन ’

### ग्रंथसमीक्षक : म. ना. अदवंत

‘ आचार्य अत्रे-साहित्यदर्शन ’ हा डॉ. ल. रा. नसिराबादकर यांचा ग्रंथ अनेक कारणांमुळे मला वैशिष्ट्यपूर्ण वाटला. आचार्य अत्रे यांचे बहुरंगी व्यक्तिमत्त्व आणि त्यांच्या साहित्याचे विविध पैलू यांचे यथार्थ आकलन होणे आणि आकलन झाल्यावर त्याचे यथार्थ मूल्यमापन करणे ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. डॉ. नसिराबादकरांना याची जाणीव आहे. एका प्रचंड बहुरंगी आणि बहुढंगी व्यक्तिमत्त्वाचा, वेडीवाकडी वळणे घेणाऱ्या ह्या एका रम्य पण प्रदीर्घ प्रवासाचा मागोवा घेणे हे एक आव्हान आहे. ते आव्हान डॉ. नसिराबादकरांनी स्वीकारले आणि आचार्य अत्रे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि साहित्याचे यथायोग्य दर्शन त्यांनी या ग्रंथात घडविले. ते करताना त्यांनी विभूतिपूजेची दृष्टी ठेवली नाही. अत्र्यांच्या गुणांचा ज्याप्रमाणे त्यांनी गौरव केला, त्याप्रमाणे त्यांच्या मर्यादांचे आणि त्यांच्यामधील दोषांचेही त्यांनी विस्मरण घडू दिले नाही. त्यामुळे या ग्रंथात आचार्य अत्रे यांच्या साहित्यविषयक कामगिरीचे यथार्थ मूल्यमापन झाले आहे. एका साहित्यिकाचा विशेष अभ्यास या दृष्टीने हा ग्रंथ त्यामुळे वैशिष्ट्यपूर्ण वाटतो

या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात आचार्य अत्रे यांच्या जीवनाच्या आणि साहित्याच्या वाटचालीचा आलेख घेतला आहे; आणि नंतरच्या दोन ते दहा या प्रकरणांतून आचार्य अत्रे यांनी ज्या ज्या वाङ्मयप्रकारांत विहार केला, त्या त्या वाङ्मयप्रकारांत त्यांनी घातलेली भर स्पष्ट केली आहे. पहिल्या प्रकरणात ‘ मी कसा झालो ’ व ‘कऱ्हेचे पाणी ’ या आचार्य अत्रे यांच्या आत्मचरित्रपर ग्रंथांच्या साहाय्याने आचार्य अत्रे यांचे विविधरंगी व्यक्तिमत्त्व लेखकाने आपणापुढे साकार केले आहे. वैविध्य व वैचित्र्य हा अत्र्यांचा मनाचा धर्म कसा आहे आणि त्यामुळेच ज्या क्षेत्रात ते शिरले, तेथे यश मिळाल्यावर फार काळ त्या क्षेत्रात ते कसे रमू शकले नाहीत, याचे विवेचन लेखकाने मूलगामी पद्धतीने केले आहे. आचार्य अत्रे यांचे शैक्षणिक क्षेत्रातील कार्य, राजकीय क्षेत्रातील कार्य व वृत्तपत्राच्या क्षेत्रातील कार्य याचा त्यांच्या आत्मचरित्राच्या साहाय्याने आढावा घेत त्यांचे व्यक्तिमत्त्व डॉ. नसिराबादकर यांनी आपणापुढे उभे केले आहे. साहित्यिक या नात्याने विविध वाङ्मयक्षेत्रांतील त्यांची वाटचालपण

थोडक्यात या प्रकरणात आलेली आहे. त्यांच्या जीवनातील यशापयशाची मीमांसा करताना त्यांच्या गुणाचा जसा लेखकाने गौरव केला आहे, तसा त्यांच्या स्वभाव-दोषांचापण उल्लेख केलेला आढळतो. मात्र या स्वभावदोषांचे लेखकाने शेवटी कौतुकच केले आहे आणि त्यांचे समर्थनपण केले आहे. आत्मप्रसिद्धीचा सोस या स्वभावदोषाचे दिग्दर्शन करताना ‘ स्वतःविषयी अधिक काही सांगणे अप्रशस्त आहे हे बंधन अत्र्यांच्या जबरदस्त आणि धसमुसळ्या प्रकृतीला मानवणेच शक्य नव्हते,’ असे ते सांगतात. अतिशयोक्ती हा अत्र्यांचा प्रकृति-धर्म आहे हे लक्षात टेवून त्यांची ओळख करून घ्यावी असे त्यांना वाटते. त्यामुळे अत्र्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध व बोध घेताना त्यांच्या गुणसमुच्चयाकडेच डॉ. नसिराबादकर अधिक आकृष्ट झाले हे स्पष्ट होते. या पिढीवर आचार्य अत्र्यांच्या व्यक्तित्वाने जी मोहिनी घातली आहे ती लक्षात घेता हे अगदी स्वाभाविक वाटते.

यानंतरच्या प्रकरणांतून कवी, नाटककार, आत्मचरित्रकार, कथाकार, चरित्रकार या विविध नात्यांनी अत्रे यांनी जी कामगिरी केली आहे, तिचे विस्तृत आणि चिकित्सक असे विवेचन आले आहे. प्रत्येक प्रकरणात त्या त्या वाङ्मयप्रकारात आचार्य अत्रे यांनी जे लेखन केले त्याचा लेखकाने प्रथम आढावा घेतला आहे; आणि नंतर त्या त्या वाङ्मयप्रकारात त्यांनी जी वैशिष्ट्यपूर्ण भर घातली त्याचे स्वरूप स्पष्ट केले आहे. त्या दृष्टीने ‘ कवी आणि विडंबनकार अत्रे, ’ ‘ नाटककार अत्रे, ’ ‘ अत्र्यांची आत्मचरित्रे ’ आणि ‘ पत्रकार अत्रे ’ ही प्रकरणे विशेष उल्लेखनीय आहेत.

‘ कवी आणि विडंबनकार अत्रे ’ या प्रकरणात प्रथम अत्रे यांच्या ‘ गीतगंगे’तील काव्याचा परिचय करून दिला आहे. त्यांच्या उमेदवारीच्या काळातील कविता कशा कृत्रिम आहेत आणि अशुद्ध रचना व छंदोभंग यांसारखे दोष पण त्यांच्या काव्यातून कसे आढळतात, याचे दिग्दर्शन लेखकाने या विवेचनात केले आहे. विडंबन कवितांचा परिचय करून देताना ज्या मूळ कवितेचे, कवीच्या शैलीचे वा वृत्तीचे ती कविता विडंबन असेल त्या मूळ कवितेचा उल्लेख व परिचय त्यांच्या विवेचनात आला आहे. याच प्रकरणात विडंबन काव्याचे स्वरूप लेखक स्पष्ट करतात आणि त्या क्षेत्रातील आचार्य अत्रे यांच्या वैशिष्ट्याची जाणीव करून देतात. ‘ झेंडूची फुले ’ या संग्रहाच्या निरनिराळ्या आवृत्तींचा इतिहास यात आला आहे. एका दृष्टीने हे प्रकरण मराठी-मधील विडंबन काव्याचा छोटासा इतिहासच आहे, असे म्हणण्याइतकी विडंबन काव्याविषयीची परिपूर्ण माहिती या प्रकरणात आली आहे. ‘ नाटककार अत्रे ’ हे प्रकरणही असेच विस्ताराने लिहिलेले आहे.

अत्र्यांच्या ‘ वीरवचन ’ व ‘ गुरुदक्षिणा ’ या नाटकांचा थोडक्यात उल्लेख करून डॉ. नसिराबादकर यांनी ‘ साष्टांग नमस्कार ’ ते ‘ ब्रह्मचारी ’ या अत्र्यांच्या सर्व नाटकांचा विस्ताराने परामर्श घेतला आहे. प्रथम अत्र्यांच्या काळातील रंगभूमीचे

स्वरूप थोडक्यात सांगून, त्या पार्श्वभूमीवर नाटककार या नात्याने त्यांनी केलेल्या कार्याचे चिकित्सक व समतोल विवेचन या प्रकरणात आले आहे. प्रत्येक नाटकाचा विचार करताना त्या नाटकावरील त्या त्या काळी आलेल्या टीकेचे समालोचन डॉ. नसिराबादकर यांनी केले आहे. अत्र्यांच्या प्रत्येक महत्त्वाच्या नाटकाचे विवेचन हा त्या नाटकाचा चिकित्सक अभ्यास आहे. त्यामुळे या प्रकरणाला विशेष महत्त्व आले आहे. 'नाटककार अत्रे : एक चिंतन' यामध्ये त्यांनी अत्र्यांच्या नाटकांबद्दल काढलेले निष्कर्ष त्यांच्या चिकित्सक वृत्तीची साक्ष देतात. 'अत्र्यांची आत्मचरित्रे' या प्रकरणात त्यांनी 'मी कसा झालो?' व 'कऱ्हेचे पाणी' या अत्र्यांच्या दोन आत्मचरित्रांचा ऊहापोह केला आहे. 'मी कसा झालो?' याचा प्रकरणशः गोषवारा देऊन आत्मचरित्र या नात्याने त्याची मीमांसा केली आहे. 'मी कसा झालो?' हे आत्मनिवेदनाची डूब असलेले ललित निबंध आहेत, या डॉ. पारखे यांचा मताची दखल घेतली आहे. 'कऱ्हेचे पाणी' हे आत्मचरित्र लिहिताना अत्र्यांची भूमिका कोणती होती व त्यातून कोणकोणते दोष या आत्मचरित्रातून दिसून येतात, याचे विवेचन करताना लेखकाने अत्र्यांच्या लेखनातील सैलपणा, भडकपणा, पूर्वग्रहदूषित मते व कालक्रमाची विसंगती इत्यादी दोषांचे स्वरूप स्पष्ट केले आहे; आणि हे दोष असूनही 'कऱ्हेचे पाणी' वैशिष्ट्यपूर्ण का वाटते, याची त्यांनी मार्मिक मीमांसा केली आहे.

'पत्रकार अत्रे' हे प्रकरण काही मर्यादेपर्यंतच जमलेले आहे. वृत्तपत्रांतून आलेल्या आणि पुस्तकांतून संग्रहित झालेल्या निबंधांच्या आणि अग्रलेखांच्या आधारे त्यांचे या क्षेत्रातील यश अजमाविण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे, इतर क्षेत्रांपेक्षा पत्रकारितेच्या क्षेत्रातच अत्रे अधिक का रमले, हेच क्षेत्र त्यांना अधिक का मानवले, याची त्यांनी केलेली मीमांसा मान्य होण्यासारखी असली तरी पत्रकारांची भूमिका स्वीकारल्याने अत्र्यांच्या लेखनात नंतरच्या काळात एकांगीपणा कसा येत गेला, याचे विवेचन यात आले नाही. निबंधकार या नात्याने त्यांनी नाव मिळविले. (बहुतेक निबंध या व्यवसायाच्या निमित्ताने लिहिले गेले.) पण त्यामुळे त्या निबंधांत वैचारिक खोलीपेक्षा पसरटपणा, अतिरंजितता व भडकपणा कसा आला, याचे विवेचन यात आले नाही. मात्र काही निबंधांच्या आधारे अत्र्यांच्या शैलीतील काव्यात्मता, वक्तृत्वगुण आणि भावोत्कटता लेखकाने योग्य रीतीने दाखविली आहे. पत्रकार म्हणून जे गुण त्यांच्या अंगी होते त्यांचे विवेचन व्यवस्थित आहे. जे दोष त्यामुळे निर्माण झाले त्यांचा विचार मात्र फारसा झाला नाही. पण 'वृत्तपत्रातील त्यांचे लेखन हा त्यांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाचा अस्सल मराठमोळा आविष्कार आहे,' हे विधान काही प्रमाणात मान्य व्हावयास हवे.

अत्रे यांच्या कथात्मक लेखनाचे स्वरूप मात्र या ग्रंथात तितकेसे समाधानकारक-

पणे रंगवले गेले नाही. कथांचा सारांश देऊन त्यावरील आपले भाष्य लेखकाने थोडक्यात आटोपले आहे. अत्र्यांच्या कथा तशा संख्येने थोड्या असल्या तरी विनोदी कथेच्या क्षेत्रात त्यांनी घातलेली भर वैशिष्ट्यपूर्ण आहे, याची जाणीव डॉ. नशिराबादकर यांनी करून दिली नाही. ' अत्र्यांच्या बहुतेक कथा घटनाप्रधान आहेत, ' हे त्यांनी केलेले विधानही ढोबळ वाटते. ' अत्रेलिखित चरित्रे ' व 'अत्र्यांचे बालवाङ्मय ' ही प्रकरणे माहितीवजा आहेत. ' अत्रे : विनोद आणि वक्तृत्व ' प्रकरण काहीसे वेगळे आहे. ' विनोद हा आत्रेय व्यक्तिमत्त्वाचा एक अविभाज्य घटक आहे ' हे विधान करून विनोदाचे आत्रेय तत्त्वज्ञान लेखकाने त्यांच्या ' विनोदगाथे 'च्या आधारे सांगितले आहे. विनोदाच्या क्षेत्रात अत्रे कुठे कुठे व कसे चमकले, कोल्हटकर-गडकरी यांच्यापेक्षा त्यांच्या विनोदाचे स्वरूप वेगळे कसे होते, याची त्यांनी थोडक्यात केलेली मीमांसा पटण्यासारखी आहे. याच प्रकरणाच्या उत्तरार्धात अत्र्यांच्या वक्तृत्वगुणासंबंधीचे विवेचन आले आहे. ते जरा अधिक विस्तृत यावयास हवे होते. कारण अत्र्यांच्या असीम लोकप्रियतेत त्यांच्या ' वक्तृत्वगुणा 'चा फार मोठा वाटा आहे.

' साहित्यिक अत्रे ' यामध्ये अत्रे यांची वाङ्मयविषयक मते उद्धृत करण्यात आलेली असून वाङ्मयाकडे पहाण्याचा त्यांचा दृष्टिकोण स्पष्ट करण्यात आला आहे. त्या अनुषंगाने त्यांनी साहित्यावर दिलेली वेगवेगळी व्याख्याने, वेळोवेळी लिहिलेले लेख, प्रस्तावना इत्यादींचा आधार घेतला आहे. अत्र्यांची वेगवेगळ्या संदर्भात प्रगट झालेली मते अनेकदा विसंगत वाटतात–याचे कारण लेख लिहिताना किंवा भाषण करताना त्या त्या प्रसंगाने वा साहित्याने ते भारावून गेलेले असतात. परमतांचा उपहास करण्याच्या वा त्यांना हास्यास्पद ठरविण्याच्या भरात पण ते अनेकदा अतिरंजित विधाने करून जातात. त्यामुळे अत्र्यांचे वाङ्मयविषयक सलग असे तत्त्वज्ञान नाही; किंवा सलग असा विचार नाही. ' अत्र्यांची साहित्यविषयक भूमिका निखळ आणि शुद्ध जीवनवादाची आहे. ' हे डॉ. नशिराबादकरांचे मत काही प्रमाणातच मान्य होण्यासारखे आहे.

' अत्रे : व्यक्ती आणि शैली ' हे शेवटचे समारोपाचे प्रकरण मात्र अतिशय मार्मिक आहे. आत्रेय साहित्याचा आणि आत्रेय व्यक्तिमत्त्वाचा अनुबंध शोधण्याचा प्रयत्न या प्रकरणात लेखकाने केला आहे. प्रत्येक क्षणातले आणि प्रत्येक रूपातले अत्रे खरे कसे आहेत हे दाखविण्यासाठी त्यांच्या स्वभावातील वेगवेगळ्या पैलूंची त्यांनी मोठी मार्मिक मीमांसा केली आहे. त्यांच्या शैलीचे विविध रंगसुद्धा त्यांनी या प्रकरणात टिपलेले आहेत. ' उपहास आणि विनोद ' ही अत्र्यांची दोन प्रभावी शस्त्रे जरी असली तरी वेगवेगळ्या प्रसंगी त्यांची शैली वेगवेगळे रूप कसे धारण करते, याचे लेखकाने चांगले विवेचन केले आहे. ' आज माझी जी लेखनशैली आहे, ती माझ्या

अनुक्रमणिका

स्वतःची आहे हे माझ्या शत्रूंनापण मान्य करावे लागेल.' हे अत्र्यांचे उद्गार सार्थ कसे आहेत ते लेखकाने आपल्या विवेचनातून चांगले पटवून दिले आहे.

—'आचार्य अत्रे–साहित्यदर्शन' या ग्रंथाचे स्वरूप हे असे आहे. आत्रेय साहित्याची एक प्रदक्षिणा केल्याचे समाधान हा ग्रंथ वाचताना लाभते आणि आचार्य अत्रे यांच्या विविधरंगी व्यक्तिमत्त्वाचे डोळसपणे घडविलेले दर्शनही मनाला आल्हाद देते. हा ग्रंथ लिहिताना अत्र्यांच्या व्यक्तिमत्त्वाने व साहित्याने भारलेला लेखक जरी आपणाला दिसत असला, तरी लेखकांच्या विवेचनात चिकित्सक वृत्ती आहे हे मान्य करावयास हवे. गुणाबरोबर दोषांची मीमांसासुद्धा येथे परखडपणे केलेली आढळेल. अत्र्यांच्या साहित्यावर वेळोवेळी आलेल्या टीकेची यात योग्य दखल घेतलेली दिसेल. विशेष म्हणजे लेखकाने आत्रेय लेखनाच्या सर्व पैलूंचे सौंदर्य रसिकतेने वाचकांच्या प्रत्ययाला आणून दिले ही या ग्रंथाची फलश्रुती.

म्हणून एका साहित्यिकाचा विशेष अभ्यास या दृष्टीने मला हा ग्रंथ उल्लेखनीय, अभ्यसनीय व संग्रहणीय वाटतो.

**'आचार्य अत्रे : साहित्यदर्शन.'**

लेखक : डॉ. लक्ष्मण रामदास नसिराबादकर, शहाजी छत्रपती महाविद्यालय, फुले सदन, कोल्हापूर–२.

प्रकाशक : एम. व्ही. फडके आणि कंपनी, महाद्वार रोड, कोल्हापूर–२. प्रथमावृत्ती, १९७६, पृष्ठे डेमी ३२०, मूल्य बावीस रुपये.

* * *

वाङ्मय ही समाजाची नाडी आहे. कोणत्याही समाजाच्या वाङ्मयीन स्वरूपावरून तो समाज संस्कृतीच्या कोणत्या पायरीवर आहे हे समजते. ह्या वाङ्मयावरून सरकार, लोक व विद्यापीठ या तीनही संस्था परीक्षिल्या जातात. वाङ्मयाच्या बऱ्यावाईटपणाची जबाबदारी तीनही संस्थांवर सारखीच आहे. म्हणून वाङ्मयविषयक कार्यात लोकांप्रमाणेच विद्यापीठाने व सरकारनेही लक्ष घातले पाहिजे.

—ना. गो. चापेकर

(मराठी साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषण, बडोदे, १९३४.)

# १६

## ' संस्कृत उक्तिविशेष '

### ग्रंथसमीक्षक : नी. शं. नवरे

संस्कृत भाषेच्या वैभवामध्ये सुभाषितांची चमकणारी रत्ने हे एक अनन्यसाधारण असे वैभव होय. भारतीय परंपरेचा तो एक मोठा ठेवा आहे. प्रसिद्ध आंग्ल संस्कृतज्ञ एफ. डब्ल्यू थॉमस यांनी असे म्हटले आहे की, " मी संस्कृतकडे प्रथम कशाने आकृष्ट झालो असेन, तर त्यातल्या काव्यनाटकांनी नाही, त्यातल्या तत्त्वज्ञानाने नाही, तर त्यातल्या सुभाषित वाङ्मयाने. "

उक्तिविशेष हा अमरेंद्र गाडगिळांनी संपादिलेला ग्रंथ अनेक दृष्टींनी अभिनव आहे. ' सुभाषितरत्न भांडारम् ' हा सर्वत्र प्रचारात असलेला सुप्रसिद्ध ग्रंथ आहे. पण त्यात न आढळणाऱ्या कितीतरी गोष्टी गाडगीळ यांनी या ग्रंथात दिलेल्या आहेत. श्लोकांचे मूळ संदर्भ यात दिलेले आहेत. त्यानंतर त्यांचे सुबोध व मर्मग्राही अर्थ दिलेले आहेत. तसेच व्यवहारामध्ये त्या उक्तीचा उपयोग कसा व कोठे करतात हेही विशद केले आहे. गाडगीळांची कल्पना नवीन आहे, शिक्षक, व्याख्याते, प्रवचनकार व लेखक यांना पुष्कळ वेळा असा अनुभव येतो की, एखाद्या सुभाषिताचा एकच चरण आठवतो, बाकीचे आठवत नाहीत. त्यांना या ग्रंथाचा वाटाड्यासारखा उपयोग होण्यासारखा आहे.

सर्वतोमुखी असलेल्या पाचशे पस्तीस उक्तींचा संग्रह येथे केला आहे. उपनिषदे, रामायण, महाभारत, पुराणे, नाटके महाकाव्ये, हितोपदेश पंचतंत्र, भर्तृहरीची शतके, स्तोत्रे इत्यादिकांतील सूक्ती दिलेल्या आहेत. काही स्थळी जे पाठभेद आहेत, तेही नमूद केलेले आहेत. ' जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ' हे वचन सर्वपरिचित आहे. पण त्याचे मूळ गवसत नाही, त्याची पहिली ओळ ' अपि स्वर्णमयी लंका न मे लक्ष्मण रोचते ' अशी आहे. यावरून ही उक्ती रामायणातील असावी असा तर्क संभवतो. परंतु रामायणामध्ये तो श्लोक आढळत नाही. याचा निर्देश करण्यास संपादक विसरलेले नाहीत. पारतंत्र्याच्या काळात, स्वातंत्र्याची प्रेरणा देण्यासाठी, कोणा प्रतिभाशाली महाभागाने ' जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ' या वचनाला जन्म दिला असावा आणि नंतर ' अपि स्वर्णमयी लंका ' इत्यादी अनुरूप चरण त्याला अन्य कोणी तरी जोडला असावा. यामध्ये अगदी बेमालूम सांधेजोड झालेली

आहे, म्हणूनच हा श्लोक रूढ झाला आहे. 'अधिकस्य अधिकं फलम्' हे म्हणीसारखे वापरले जाणारे वचन; पण सबंध श्लोक फारच थोड्या लोकांना माहीत असेल ! तो श्लोक असा :

लेखनी सर्व वर्णेषु विधिना निर्मिता पुरा।
नवांगुलप्रमाणेन, अधिकस्याधिकं फलम्।
(उक्ती १४, पृ. ७.)

या श्लोकाचा अर्थ पुस्तकात दिलेला आहे, तो असा : "पूर्वी ब्रह्मदेवाने सर्व लोकांसाठी नऊ बोटे लांब लेखणी निर्माण केली. अधिक लांब असली तर अधिक फलदायी होईल. (या शब्दशः अर्थापेक्षा नवांगुल प्रमाण असलेल्या लेखणीचा जितका उपयोग साहित्यनिर्मितीकरिता करावा तितकी तितकी ती अधिक फलदायी हा अर्थ उचित वाटतो.")

—हा अर्थ समाधानकारक नाही याची संपादकांना जाणीव आहे. म्हणूनच त्यांनी कंसात त्यावर भाष्य केले आहे. पण त्यावरूनही श्लोकाचा उलगडा होत नाही. (लेखणी ९ अंगुलींपेक्षा अधिक लांब केली तर लिहिणे कठीणच !)

या श्लोकांचा पुढील अर्थ अधिक समर्पक वाटेल.

ब्रह्मदेवाने लेखणी निर्माण केली. आणि त्यायोगे माणसाला एक नवीन बोटच त्याने दिले. पाच बोटे आहेतच त्यात हे नवीन सहावे बोट. ('नव' याचा अर्थ 'नऊ' असा न करता 'नवीन' असा घेतला पाहिजे.) सर्व वर्णांसाठी म्हणजे सर्व मुळाक्षरे (अ पासून ज्ञ पर्यंत) लिहिण्यासाठी– बोटांची संख्या एकाने वाढल्यामुळे– अधिक सामर्थ्य प्राप्त झाले.

या ग्रंथाला डॉ. रा. ना. दांडेकर ह्यांचा 'पुरस्कार', डॉ. श्री. भा. वर्णेकर यांची 'प्रस्तावना' व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांची 'भूमिका' लाभली आहे. ग्रंथाचे हृद्गत समजण्यास त्यांचा निश्चित उपयोग होईल.

मोठ्या आकाराची ३२७ पृष्ठे असलेल्या या ग्रंथाची छपाई सुबक झाली आहे. संदर्भग्रंथाची यादी, श्लोकसूची, विषयसूची व परिशिष्टे देऊन संपादकांनी कोणतीही उणीव राहू न देण्याची कोशीस केली आहे.

**'संस्कृत उक्तिविशेष'**

संपा. अमरेंद्र गाडगीळ, व्होरा आणि कंपनी, पब्लिशर्स, मुंबई–२, १९७६, मूल्य तीस रुपये.

* * *

# १७

## ' झेंडूची फुले ' आणि ' गोस्वामीमानवप्रकाशम् '

### एक शंका : वा. पु. कोल्हटकर

( १ ) ' महाराष्ट्र साहित्य पत्रिका : अंक १८४ वा : जा.फे.मा १९७३ ' या अंकात ' झेंडूची फुले —केशवकुमार, संपा. स. ग. मालशे ' या पुस्तकावर श्री. व. शां. देसाई यांनी लिहिलेला अभिप्राय प्रसिद्ध झाला आहे. या अभिप्रायात, पृ. १२० अखेर श्री. देसाई लिहितात, " गोस्वामी मानवप्रकाशम् ही संघटना १९२६ साली निर्माण झाली. त्यात...फक्त अत्रे, देवभक्त आणि कमतनूरकर या तिघांचाच समावेश होता."

( २ ) ' अशीच एकाची गोष्ट ' या आत्मचरित्रात पृ. ९८ वर हेच देसाई म्हणतात, " देवभक्तांच्या जागेत अत्र्यांची बैठक नेहमी असे. बन्याबापू (कमतनूरकर) पुण्यात असले म्हणजे आमच्याकडे राहात असत. ना. वि. कुलकर्णी यांच्या 'महाराष्ट्र कुटुंबमाले 'त वरेरकरांची ' चिमणी ' प्रसिद्ध झाली. ' चिमणी ' वरून ' कावळा ' सुचला; आणि ' कुटुंब 'मालेवरून ' फकीर ' माला ! ' महाराष्ट्र फकीरमाले 'चे पहिले पुष्प ' कावळा ' या नावाने काढावे असे आमच्या बैठकीत ठरले. गोविंदराव, बन्याबापू, देवभक्त, अत्रे आणि मी लिहायला सिद्ध झालो. मामा हुदलीकर आणि चित्रकार काळे यांना ती कल्पना समजताच त्यांनीही लिहायचे कबूल केले. लेखकाचे नाव प्रत्येकाचे आद्याक्षर जमवून तयार केले–' गोस्वामीमानवप्रकाशम् '! गोस्वामी ( गोविंदराव ), मा ( मामा हुदलीकर ), न ( न. ग. कमतनूरकर ), व (व. शां. देसाई, प्र ( प्र. के. अत्रे ), का ( काळे ) आणि शम् ( शं. कृ. देवभक्त )!"

( ३ ) म. सा. पत्रिकेतील अभिप्राय–लेखात देसाईंनी तिघांची नावे दिली आहेत आत्मचरित्रात मात्र ते सात नावांचा निर्देश करतात. हाच निर्देश बरोबर आहे.

( ४ ) देसाई यांना प्रकाशनकाल व लेखक–नामतपशील स्मृतीत नेमके पकडता आलेले नाहीत.

( ५ ) म. सा. पत्रिकेच्या ' अंक १८५ ' मध्ये डॉ. स. गं. मालशे यांनी केलेला खुलासा प्रसिद्ध झाला आहे. पण डॉ. मालशे यांनाही ' लख्या लकतऱ्या 'चा प्रकाशनकाल नेमका गवसलेला नाही.

अनुक्रमणिका

( ६ ) पुण्यातील शासकीय विभागीय ग्रंथालयात ' लख्या लकतऱ्या 'ची ' संग्रह-प्रत ' आहे. ( मुद्रकांनी सरकारकडे कायद्याच्या सक्तीमुळे सादर केलेली संग्रहालयाची प्रत. ) जुन्या काळी ' ओरिएंटल ट्रान्स्लेटर 'ची जी कचेरी होती, तिचे आजचे नामांतर ' एक्झामिनर ऑफ बुक्स 'ची कचेरी त्या जुन्या ओ. ट्रा. कचेरीत ' लख्या लकतऱ्या ' दाखल झाल्याची तारीख २ ऑगस्ट १९२८ अशी आहे. तसेच ' कावळा ' व ' मास्तर ' यांच्याही प्रती विभागीय ग्रंथालयात आहेत.

## खुलासा : स. गं. मालशे

( १ ) ' लख्या लकतऱ्या ' हे ' गोस्वामी मानवप्रकाशम् '–कृत ' फकीर माले 'च्या चार मण्यांपैकी तिसरे होते, असे उल्लेख पूर्वसूरींनी केले आहेत. या चार मण्यांपैकी ' कावळा ' ( १९२६ ) व ' मास्तर ' ( १९२७ ) या पहिल्या दोहोंवर प्रकाशनकाल दिलेलाच आहे. ' पांचजन्याङ्क ' हा चौथा मणी. त्यावर कालनिर्देश नाही. पण त्याचा प्रकाशनकाल ' एप्रिल १९२९ च्या सुमाराचा ' असल्याचे त्या पुस्तकातील अंतर्गत उल्लेखांवरून सिद्ध केलेले आहे. ( पहा : ' तऱ्हेवाईक पुस्तके : पांचजन्याङ्क–स. गं. मालशे,' **साहित्यसहकार**, व. १९, अं. ५, ऑगस्ट १९६९, पृ. ३४-३५ ) तेव्हा ' लख्या लकतऱ्या ' हा तिसरा मणी दुसऱ्याच्या नंतरचा आणि चौथ्याच्या अगोदरचा, म्हणजे १९२८ मधला प्रायः ठरतो.

( २ ) शिवाय मी संपादित केलेल्या ' झेंडूच्या फुलां 'च्या प्रस्तावनेत मी एक टीप दिली आहे; व ' फकीर माले 'त तीनच मणी निघाल्याचा व. शां. देसाई यांचा गैरसमज दाखवून दिला आहे. फकीरमालेत तीनच पुस्तिका प्रसिद्ध झाल्या नव्हत्या. मास्तर ( १९२७ ) व ' पांचजन्याङ्क ' ( १९२९ ) यांच्या दरम्यान मालेचा तिसरा मणी म्हणून ' लख्या लकतऱ्या ' ही पुस्तिका प्रसिद्ध झालेली होती. तीवर प्रसिद्धिकाल दिलेला नाही." ( पहा : केशवकुमारकृत **झेंडूची फुले**, ' प्रस्तावना ', आ. ८ वी, मुंबई, १९७२, पृ. २१. )

( ३ ) कोल्हटकरांना २ ऑगस्ट १९२८ ही पुस्तकाची दाखल तारीख मिळाली आहे. त्या पुस्तकाचा नेमका प्रकाशनकाल गवसलेला नाही, ते प्रकाशनकालाच्या अधिक जवळ गेले आहेत. अर्थात त्यालाही काही महत्त्व आहेच. * * *

जिथे काम तेथे उभा श्याम आहे.
नव्हे धर्म रे धर्म ते रूप आहे;
असे विश्वकर्मा श्रमांचा पुजारी,
**जिथे राबती हात तेथे हरी.**

—ग. दि. माडगूळकर

# १८

## ‘ सुभाषमय दिवसां ’चा रम्य आलेख

### ग्रंथसमीक्षक : सुप्रिया मधुकर अत्रे

हिंदी व मराठी या दोन्ही भाषांतील एक सिद्धहस्त लेखक डॉ. अशोक प्रभाकर कामत यांनी हे अनुवादित पुस्तक सादर केले आहे. सुभाषमय दिवस ही डॉ. कामतांनी अनुवादिलेली आशा सान यांची डायरी म्हणजे नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या जीवन-चरित्रातील अविस्मरणीय भागाचा ज्वलंत चित्रपटच आहे.

स्वातंत्र्य-संग्रामातील तेजस्वी पर्वाच्या साक्षीदार म्हणून आशा सान यांचे नाव घेतले जाते. नेताजी सुभाषचंद्र बोस यांचे निकटवर्ती स्नेही व आझाद हिंद सेनेचे एक सेनानी आनंद मोहन सहाय यांची ही कन्या. एका धुरंधर पित्याची कन्या, व धैर्यवान आणि उदात्त व्यक्तिमत्त्वाची महिला.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात, प्रत्यक्ष टोकिओमध्ये सहाय कुटुंब राहात असताना युद्धाच्या धुमश्चक्रीतील अनेक लहानमोठ्या घटना त्यांनी प्रत्यक्ष पाहिल्या व अनुभवल्या. शब्दांकनही केले. यामुळेच केवळ खराखुरा इतिहास आपणाला समजतो. आशा सान यांच्या तोंडून आपण ही कहाणी ऐकत आहोत असाच जणू भास होतो.

या दैनंदिनीचा प्रवास आहे फक्त दोन वर्षे व दोन महिने इतका. १३ जून १९४३ ला सुरू होणारी ही कथा संपते २३ ऑगस्ट १९४५ ला. सुभाषचंद्रांनी भारत सोडून टोकियोत प्रवेश केला, इथपासून तो त्यांच्या मृत्यूपर्यंतचा सारा इतिहास एवढ्या अल्प काळात सामावला आहे.

नेताजी सुभाषचंद्र बोस हा त्या काळात जपानमध्ये परवलीचा शब्द झाला होता. जपानमध्ये असणारे जे थोडे भारतीय होते, त्यांना नेताजींबद्दल आत्मीयता वाटावी हे जरी खरे असले, तरी जपानी लोकांनासुद्धा त्यांनी जिंकले होते. नेताजींच्या विलक्षण व्यक्तिमत्त्वाने ते भारावून गेले होते. त्या लोकांचे सारे जीवन सुभाषचंद्रांनी मंतरून टाकले होते. उपासमार, यातना, रोज होणारे बॉम्बहल्ले इ. गोष्टी ते विसरून गेले होते. नेताजींच्या जिद्दी आणि जोशपूर्ण भाषणांमधून अनेकांनी प्रेरणा घेतली, आणि ते आझाद-हिंद सेनेचे अनुयायी बनले.

आपल्या दैनंदिनीच्या सुरुवातीच्या भागात आशा सान यांनी जपानमधील युद्धमय वातावरण, रोज येणारी अमेरिकन ‘ मच्छरे ’, कुटुंबांची होणारी वाताहात, रेशनिंगवर

मिळणारा तुटपुंजा शिधा...साऱ्या जीवनाला व्यापून राहणारी ही अनिश्चितता असूनही आत्मविश्वासाने आझाद-हिंद सेनेशी करारबद्ध होणारे नागरिक यांची छोट्या छोट्या प्रसंगांतून ओळख करून दिली आहे.

२१ ऑक्टो. १९४३ या दिवशी आझाद हिंद सरकारची स्थापना झाली आणि या घटनेचा सर्वत्र जबरदस्त परिणाम झाला. अनेक देशांनी ह्या घटनेला मान्यता दिली व जपानमध्ये उत्साहाचे वातावरण निर्माण झाले. जो तो आझाद हिंद सेनेशी करारबद्ध होण्याचा प्रयत्न करू लागला. येणाऱ्या परिस्थितीला धैर्याने तोंड देण्याचा आत्मविश्वास सुभाषबाबूंनी निश्चितपणे सैनिकांच्या मनात जागृत केला; व त्यामुळेच उपासमार सहन करूनही, वेळीच जपानी लोकांनी मदतीचा घेतलेला आखडता हात असूनही सैनिकांचे मनोधैर्य जरासुद्धा कमी झाले नाही. ह्या साऱ्या भागाचे वर्णन करताना आशा सान इतक्या काही रंगून गेल्या आहेत की, आपल्याही मनात 'पुढे काय?' ही उत्सुकता व्यापून राहते.

२५ मार्च १९४५ हा दिवस लेखिकेच्या जीवनातला परमोत्कर्षाचा दिवस! नेताजींच्या राणी लक्ष्मीबाई पथकात त्यांना प्रवेश मिळाला. आपल्या जीवनाचे सार्थक झाल्याचे समाधान त्यांच्या प्रत्येक वाक्यातून येथे जाणवते. त्यांच्या मातोश्रीने त्या वेळी त्यांना केलेला उपदेश म्हणजे जणू भारतीय आदर्श मातेचे प्रतीकच! "तू माझी मुलगी नाहीस. आता तू भारतमातेची कन्या आहेस. यापुढे तू कुणाचेही ऐकायचे नाहीस. फक्त नेताजी सांगतील तेवढेच ऐकायचे!" खरोखर या शब्दांत स्वदेशा-विषयीचे प्रेम, निष्ठा ह्यांचाच साक्षात्कार होतो. यानंतर रेजिमेंटमधील त्यांनी घालविलेले दिवस व त्यांच्या सहवासातील भगिनींची व्यक्तिचित्रे या गोष्टी रेखाटण्यात बराच भाग गेला आहे.

२१ ऑगस्ट १९४५ हा दिवस काळा दिवस म्हणून मानावा लागेल. नेताजींच्या मृत्यूची बातमी एखाद्या वज्राघाताप्रमाणे येऊन कोसळली. सारे सेनानी, सैनिक, नागरिक ह्या बातमीने हादरून गेले. नेताजींच्या मृत्यूने जणू ह्यांच्या शरीरातील प्राणच कुणी काढून घेतला. अशा विमनस्क वातावरणात ही कथा संपते.

दैनंदिनी वाचीत असताना त्यातील प्रसंगांची केलेली गुंफण, घटनांची मांडामांड इतकी सुसूत्र आहे की, कुठेही तोचतोचपणा वाटत नाही. आपल्या लाडक्या नेत्याचे व्यक्तिचित्रण करीत असताना त्या कुठेही अवास्तव श्रद्धेने भारलेल्या दिसत नाहीत. तर उलट त्यांच्याविषयी श्रद्धा व आदर वाढविण्यासच कारणीभूत होतात. लेखिका केवळ घटनांची जंत्री देत बसलेली नाही, तर त्याचबरोबर त्यांचे जीवन उजळून टाकणाऱ्या लोकांचे व्यक्तिमत्त्वही त्यांनी रेखाटले आहे. त्यांनी केलेला दैनंदिनीचा शेवट इतका काही भावस्पर्शी आहे की, क्षणमात्र आपल्याही मनात असा प्रश्न येतो की, 'खरेच नेताजी अजून जिवंत असतील का?'

हल्लीच्या काळातील विद्यार्थिवर्गाला नेताजींविषयी फार कमी माहिती आहे. ही दैनंदिनी जर त्यांच्या हातात पडली तर नेताजींविषयी अधिक ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा त्यांच्या मनात निःसंशय निर्माण होईल.

मूळ जपानी भाषेत असणाऱ्या ह्या दैनंदिनीचे भाषांतर डॉ. अशोक कामत यांनी फारच प्रत्ययकारी रीतीने केले आहे. दैनंदिनी वाचीत असताना ती भाषांतरित आहे हे वाटतही नाही. मूळ मराठीतूनच ती लिहिली आहे की काय, असे वाटण्याइतपत ती रससिद्ध झाली आहे. एक सरस-सुंदर अनुवाद वाचल्याचे समाधान येथे लाभते.

'सुभापमय दिवस' (आशा सान यांची डायरी)
मराठी रूपांतर : डॉ. अशोक प्रभाकर कामत
आबासाहेब गरवारे महाविद्यालय, पुणे ४.

नूतन प्रकाशन, २१८१ सदाशिव पेठ, पुणे ३०,
प्रथमावृत्ती, मार्च १९७६, पृष्ठे क्राऊन १३०, मूल्य दहा रुपये.

* * *

## साभार स्वीकार

१. पेडणेकर नारायण रा. : शब्दस्फोट; कस्तुरीमृग प्रकाशन, मुंबई; रु. ७.
२. दवडगावकर अ. खं. : (संपा) काव्यलता; राम श्री. शिंदे, माजलगाव; रु. ३.
३. केळकर य. न. : मनाचा मोहोर; वि. य. केळकर, पुणे, रु. १०.
४. आवूज एकनाथ : एक गाव : एक मसणवटा; कल्पना प्रकाशन, गुरुवार पेठ, पुणे, रु. ५.
५. खैरे विश्वनाथ : द्रविड महाराष्ट्र; साधना प्रकाशन, पुणे, रु. २.
६. मनोहर यशवंत : उत्थानगुंफा; वामन निंबाळकर, औरंगाबाद; रु. १०
७. काशीकर चिंतामणी गणेश : श्रौत धर्माची स्वरूपचिकित्सा; पुणे विद्यापीठ, रु. ३०.
८. बरुआ बिरिंचिकुमार : आसामी साहित्याचा इतिहास; साहित्य अकादमी, नवी दिल्ली; रु. २५

# १९

## ' आई '

### मनीषा दीक्षित

नात्याने सासूबाई, वयाच्या हिशेबाने आजी, नावाने ' आई ' आणि वृत्तीने मैत्रीण झालेल्या कै. ती. मुक्ताबाई दीक्षितांची सून म्हणून दीक्षितांच्या घरात मी आले, त्याला सात वर्षं झाली. मुक्ताबाईंना आम्ही सर्वजण ' आई ' म्हणूनच संबोधत असू. कै. ती. विठ्ठलराव दीक्षित ऊर्फ ' इंटरनॅशनल ' दीक्षित हे माझे सासरे. आम्हा सर्वांचे ते नाना. मुलीची हौस माझ्यात पुरवून घेणाऱ्या आई-नानांच्या सहवासात ही सारी वर्षं किती लौकर गेली ! अडीच वर्षांपूर्वी ती. नाना गेले, तेव्हा मी माझे काय गमावले, हे मला कधीच कोणाला सांगता आले नाही.

नानांपेक्षा आईंचा सहवास मला थोडा अधिक लाभला. नानांबद्दल जे वाटे ते व्यक्त व्हायला माझ्या-त्यांच्या नात्याची मर्यादा होती. त्यापेक्षा आईंबद्दल वाटणारी भावना प्रगट करताना अधिक मोकळेपणा वाटतो आहे.

हे नाते निर्माण होण्याआधी दोन वर्षं त्यांच्या ' प्रचीती ' वाचून मी भारावले होते. रोजच्या जगण्यातलेच साधेसे वाटणारे अनुभव–त्या ' कलात्मक अनुभूती ' वगैरे आहेत का ? ' या शंकेने बेजार न होता—आपल्या अकृत्रिम शैलींत सांगणारे ते पुस्तक मन थक्क करत होते. कारण बी. ए. आटोपून मराठी विषयाची एम. ए. होण्याची स्वप्नं रंगवण्याच्या माझ्या त्या वयात ' वाङ्मयीन शैली 'बद्दलच्या रोमँटिक कल्पनांचे भूत मनावरून पुरते उतरलेले नव्हते.

' प्रचीती 'मधल्या मुक्ताबाई दीक्षित अशा होत्या की, माझे लग्न ठरल्यानंतर सुरुवातीच्या काळात त्यांचे दडपण मनावर अजिबात नव्हते. हळूहळू ' मुक्ताबाईंची होणारी सून ' म्हणून त्यांच्या परिवारात मी वावरू लागले आणि आईंच्या ' संतापा '-विषयी मंडळी सांगू लागली. माझ्याबद्दल ती थोडी काळजीही करीत असावीत.

दीक्षितांच्या घरात मी आले आणि आईंच्या या ' रागावण्या 'चा अनुभव आला –येत राहिला. अशा प्रत्येक प्रसंगी उमगत गेले की, तात्कालिक उद्रेकानंतर त्यांचे मन अतिशय निर्मळ, स्वच्छ राहात असे. त्यांच्या रागाला पात्र झालेल्या व्यक्तीने मनात आणले तरी त्यांच्याबद्दल गैरसमज ती ठेवू शकत नसे.

सासू–सुनेचे तथाकथित तेढे नाते असतानाही त्यांच्या-माझ्यातला ' संवाद ' दिल-

अनुक्रमणिका

खुलास राहिला. मतभेद होत, पण ते दोन व्यक्ती म्हणून. सासू-सून म्हणून नव्हे. अगदी एकमेकींना न मानवणाऱ्या स्वभावविशेषांसह सारे बोलून टाकण्याचा त्यांचा रिवाज. हे पथ्य केवळ माझ्याच बाबतीत नव्हे, तर अन्य सर्वांच्याच बाबतीत त्या पाळीत. समोरच्याने पाळावे असा आग्रह धरीत. "या गाठी मनात कुढून सुटत नाहीत—सुटल्याच तर बोलून सुटतात," हा त्यांचा पक्का विश्वास. त्यामुळेच आयुष्यात अनेकांशी अटीतटीची भांडणे भांडूनही त्यांच्या मनात अपराधीपणाच्या भावनेचा लवलेशही उरला नाही. त्यातली जी समंजस माणसे होती, ती त्यांना कधी दुरावली नाहीत. ज्यांनी अढी धरली त्यांच्याबद्दल आई कधी कडवट बोलल्या नाहीत.

त्यांच्या-माझ्यात अशा 'संवादा'साठी विषयही अनेक असत. वाङ्मय हा तर समान धागा होताच. स्वतःच्या लेखनासंबंधी त्या बोलत, इतरांविषयीही बोलत. दोघींनी वाचलेल्या व दोघींना आवडलेल्या-नावडलेल्या पुस्तकांवर चर्चा होई. या चर्चेत अगदी नवे लेखकही असत. माझ्या वाचण्याला, विचाराला, लेखनाला त्यांच्याशी झालेल्या चर्चांमधून दिशा मिळे; कधी त्यातल्या गोंधळाला, एकांगीपणाला नवे परिमाण लाभे. जुन्याविषयीचा डोळस जिव्हाळा आणि नव्याविषयीचे ताजे कुतूहल, जे आवडले त्याविषयी मनमोकळी दाद, नावडले त्याबद्दल गंभीरपणे विचार... त्यांच्यातले हे वाङ्मयीन व्यक्तित्व असे संपन्न होते.

हे नव्याकडचे लक्ष केवळ वाङ्मयापुरतेही मर्यादित नव्हते. भोवती घडणारे सर्वच त्यांच्या जिज्ञासेचा, कुतूहलाचा विषय असे. त्यात राजकारण असे, समाजकारण असे. अभ्यंकर कुटुंबाच्या खूनसत्रासारखा विषय असे. सगळेच आत्मीयतेने, पण तरीही काहीशा दूरस्थपणे त्या पाहात.

आजच्या काळातल्या माझ्यासारख्या अनेक मुली त्या पाहात. नोकरी, करिअर, हौशी, संसार, मूल, नवरा अशा अनेक आघाड्यांवर धडपडणाऱ्या मुलींबद्दल त्या विचार करीत. आम्ही स्वतः करीत नसू इतका. या ओढाताणीत एखाद्या वेळी मी खंतावे, चिडीला येई. पण अशा वेळी त्यांचा खेळकरपणा माझ्यावरचा ताण कमी करी. सकाळच्या धांदलीत थेट बाहेरच्या बाल्कनीत चहाचा कप मागवणाऱ्या आपल्या मुलाला त्या मधल्या खोलीतून सांगत, "गायकवाड सरकार, तिचे हात दोनच, आणि तास चोवीसच! चहा आत येऊन घ्या."

समान हक्कांसाठी भांडणाऱ्या स्त्रीचे त्यांना हसू येई. "समान—म्हणजे पुरुषासमान ना? कशासाठी? पुरुष हा कसला तुमचा आदर्श? निसर्गाने तुम्हांला जे दिले आहे, त्याबद्दल खरे म्हणजे त्या पुरुषाने हळहळावे!" नव्या पिढीतल्या या पुरुषाची तर त्या स्वतः कधी कधी कीवच करीत. म्हणत, "विचाऱ्याचे जुने सुटत नाही, नवे पुरते घेता येत नाही. बुद्धीला जे पटते ते आचरणात आणणे जड जाते. अर्धवट आधुनिक झालेल्या या समाजातल्या पुरुषाची—

अनुक्रमणिका

' जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः ।
जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ॥ '

—अशी दुर्योधनासारखी स्थिती झाली आहे. ''

या सगळ्या प्रतिक्रियेमागे त्यांची सहृदयताच असे; आणि तिचा मला नेहमी फार आधार वाटे. एखाद्या गोष्टीसंबंधीची आईची पहिली प्रतिक्रिया तीव्र भावनिक स्फोटाच्या रूपात प्रगट होत असे. पण त्यातून त्या फार लौकर सावरत. स्थिर होत; आणि त्या घटनेकडे पुन्हा पाहू शकत. यामुळेच मनःस्ताप देणाऱ्या गोष्टीतली विसंगतीही त्यांना चटकन दिसे; व त्यांच्यातली निर्व्याज विनोदबुद्धी जागी होई.

—हे त्यांना साधत असे, यामागे त्यांनी कमावलेले एक मोठे बळ होते. त्यांची चांगल्यावरची श्रद्धा. या चांगल्याला त्या 'Divine element' म्हणत. तो प्रत्येकात आहे असे मानत. त्यांची ही श्रद्धा अर्थातच आंधळी–भोळी नव्हतीच. वाचनाने, चिंतनाने व अनुभवाने जोपासलेली होती. हे प्रगल्भ, सुशिक्षित मन म्हणूनच प्रत्येक संकटातील जमेची बाजू पाहू शके.

अशा या मनाला कै. ती. नानांनी अध्यात्मविचाराचा बळकट पाया दिलेला होता. अशी डोळस श्रद्धा हा आई-नानांच्या 'सहजीवना'चा एक अतूट असा भाग होता. काळाचा एक विस्तीर्ण पट या दोघांनी पाहिला. त्यात खूप अनुभवले, खूप सोसले आणि खूप कमावले. आईंना आपल्या लेखनशक्तीचा फार मोठा आधार वाटे, तसाच त्यांनी कमावलेल्या या श्रद्धेचा ! या दोघांनी अनेक माणसे जोडली. हा प्रचंड लोकसंग्रह, मित्रपरिवार ही त्यांची खरी लौकिक कमाई. पण त्याहूनही त्यांनी मिळवलेली अलौकिक मनःशांती मोठी ! ही मनःशांती आई-नानांनी ' प्रयत्ने ' कमावलेली. संकटांच्या ' लोंढ्यां 'ना या अचल मनःशांतीनेच वेळोवेळी थोपवले.

अशी ही उदंड मिळकत असलेल्या या दोन व्यक्तींच्या घरकुलाचा एक अंश होण्याचे भाग्य मला मिळाले. या सात वर्षांत माझ्या ' दुबळ्या झोळी 'त मी काय काय घेऊ शकले नाही, याची खंत न करणेही त्यांनीच मला शिकवले आहे. कै. ती. नाना आणि कै. ती. आई या उभयतांच्या पुण्यस्मृतीचा वरदहस्त आम्हा उभयतांच्या मस्तकावर आहे. तेच आमचे फार मोठे बळ आहे !

* * *

# परिषद्-वार्ता

( १ ऑक्टोबर १९७७ ते २१ जानेवारी १९७८ )

**शारदीय व्याख्यानमाला :** काही जुन्या मौलिक ग्रंथांचा परिचय आजच्या वाचकांना व्हावा या हेतूने परिषदेने गतवर्षापासून ही व्याख्यानमाला सुरू केली. गतवर्षाप्रमाणे यंदाही या मालेस श्रोत्यांनी चांगला प्रतिसाद दिला. ऑक्टोबर १९७७ मध्ये मालेत झालेली सात व्याख्याने येणेप्रमाणे : ( दिनांक, व्याख्याते, विषय, अध्यक्ष )

१. दि. १३, डॉ. शं. गो. तुळपुळे, ' महाराष्ट्र सारस्वत ', डॉ. वि. रा. करंदीकर.

२. दि. १५, डॉ. भालचंद्र फडके, ' माझे रामायण ', प्रा. गो. म. कुलकर्णी.

३. दि. १६, प्रा. बाळकृष्ण कवठेकर, ' कीचकवध ', प्रा. म. ना. अदवन्त.

४. दि. १७, प्रा. भालबा केळकर, ' म्युनिसिपालिटी ', डॉ. प्र. रा. भुपटकर.

५. दि. १८, डॉ. गो. मा. पवार, ' सुदाम्याचे पोहे ', डॉ. म. वि. गोखले.

६. दि. १९, डॉ. ह. कि. तोडमल, ' कमला ', डॉ. अनुराधा पोतदार.

७. दि. २०, डॉ. द. ता. भोसले, ' पाणकळा ', डॉ. आनंद यादव.

दि. २१ रोजी सकाळी श्रीसरस्वतीपूजन आणि ग्रंथपूजन प्राचार्य वेणी यांच्या हस्ते होऊन मालेची सांगता झाली.

**साहित्य संमेलन :** मराठी साहित्य महामंडळाचे अ. भा. मराठी साहित्य संमेलन पुणे येथे दि. १८, १९ व २० नोव्हेंबर १९७७ रोजी श्री. पु. भा भावे यांच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले. ' पुणे नगर वाचन मंदिर ' ही संमेलनाची निमंत्रक संस्था परिषदेची संलग्न संस्था आहे. महामंडळाची घटकसंस्था या नात्याने साहित्यविषयक कार्यक्रम आणि स्मरणिका ( ' पुण्याई ' ) ही दोन कामे नगर वाचन मंदिराच्या अनुमतीने परिषदेने स्वीकारली होती. कोशकार-सूचीकार यांचा सत्कार, साहित्यविषयक दोन परिसंवाद, प्रथितयश कवींचे आणि नवोदितांचे कविसंमेलन, भाषाभगिनी–व्याख्यानमाला असे चार कार्यक्रम आठ ते दहा हजार श्रोत्यांच्या उपस्थितीत उत्साहाने पार पडले. खुल्या अधिवेशनप्रसंगी दलित पँथर, युक्रांद वगैरेंनी निदर्शने करून कामकाज अशक्य केल्यामुळे अध्यक्षीय समारोपाचे भाषण, स्वागताध्यक्षांचा सत्कार, तसेच आभारप्रदर्शन हे पूर्वनियोजित कार्यक्रम स्थगित करावे लागले. सर्वांप्रमाणे परिषदेलाही याचा अत्यंत खेद झाला. संमेलनाची स्वीकारलेली कामे पार पाडताना परिषदेला स्वागताध्यक्ष श्री. ग. ल. ठोकळ, डॉ. सरोजिनी बाबर,

अनुक्रमणिका

डॉ. वि. रा. करंदीकर, श्री. श्री. पु. गोखले. डॉ. म. वि. गोखले, श्री. वि. स. वाळिंबे, प्रा. गो. म. कुलकर्णी, सौ. शैलजा राजे, सौ. शांता निसळ इत्यादींचे साहाय्य झाले व त्याबद्दल परिषद त्यांची आभारी आहे. 'पुण्याई' या साहित्यसंमेलन स्मरणिका संपादनाची मुख्य जबाबदारी डॉ. हेमंत इनामदार आणि प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी उत्तम प्रकारे पार पाडली याचा प्रत्यय स्मरणिकेवरून सहज येईल. संमेलनाचे सविस्तर वृतान्त अनेक वृत्तपत्रे आणि नियतकालिके यांनी छापले आहेत. पुणे नगर वाचन मंदिरातर्फेही अधिकृत तपशीलवार इतिवृत्त यथाकाल प्रसिद्ध होईल. या ठिकाणी फक्त परिषदेने केलेल्या कामांची नोंद केली आहे.

**स्मृतिदिन :** कै. माधव जूलियन स्मृतिदिन २९ नोव्हेंबर १९७७ रोजी साजरा झाला. या प्रसंगी डॉ. म. वि. गोखले यांचे भाषाशुद्धीच्या संदर्भात 'सावरकर आणि पटवर्धन' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. स. शि. भावे होते.

**भेटी-गाठी :** (अ) पुण्याचे जिल्हाधिकारी श्री. दिनेश अफझुलपूरकर आणि महाराष्ट्र राज्याचे शिक्षण संचालक प्रा. वि. वि. चिपळूणकर यांनी २५ जून १९७७ रोजी सायंकाळी परिषदेस भेट दिली. परिषदेच्या कार्यकर्त्यांसमवेत तासभर त्यांनी गप्पागोष्टी केल्या. (आ) नाशिकचे डॉ. अ. वा. वर्टी हे परिषदेला नित्य भेट देणारे साहित्यिक. त्यांचा ६६ वा वाढदिवस ४ डिसेंबर रोजी होता. त्या दिवशी त्यांच्या उपस्थितीचा लाभ घेऊन परिषदेने परिचितांच्या उपस्थितीत त्यांचे हार्दिक अभिनंदन केले. यावेळी मनमोकळ्या साहित्यविषयक गप्पा झाल्या. विचारलेल्या प्रश्नांना डॉ. वर्टी यांनी आपल्या खास विनोदी शैलीत उत्तरे दिली. (इ) कोकणीचे एक खंदे पुरस्कर्ते, गोमंतकीय लेखक श्री. रवींद्र केळेकर पुण्यात आले असता, कोकणी-मराठी वादासंबंधी त्यांची भूमिका समजावून घेण्यासाठी दि. ७ डिसेंबर १९७७ रोजी त्यांचे एक व्याख्यान आयोजित केले होते. श्री. श्रीपाद जोशी यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या व्याख्यानात श्री. केळेकर यांनी आपली भूमिका अनाग्रही भूमिकेतून व परिणामकारक रीत्या मांडली; आणि श्रोत्यांचे शंकानिरसनही केले. (ई) भागलपूर विद्यापीठातील संस्कृत विभागप्रमुख डॉ. हरिमोहन मिश्र यांनी ७ डिसेंबर रोजी साहित्य अकादमी-तर्फे परिषदेला भेट दिली. पदाधिकाऱ्यांसमवेत त्यांनी परिषदेच्या कामकाजाविषयी माहिती करून घेतली व समाधान व्यक्त केले.

**पंतप्रधानांशी गप्पागोष्टी :** भारताचे पंतप्रधान श्री. मोरारजीभाई देसाई हे २७ डिसेंबर रोजी पुण्यात आले होते. दुपारी पावणेतीन वाजता परिषदेच्या सभागृहात त्यांनी काही लेखक, पत्रकार आणि विचारवंत यांच्या समवेत अर्धा तास विविध प्रश्नांवर मनमोकळेपणे चर्चा केली. पुण्याचे जिल्हाधिकारी श्री. दिनेश अफझुलपूरकर यांच्या साहाय्यामुळे पंतप्रधानांच्या भेटीचा लाभ परिषदेला झाला. कार्याध्यक्ष

श्री. श्री. ज. जोशी यांनी सर्वांच्या वतीने पंतप्रधानांचे आधी स्वागत केले. परिषदेची निवडक प्रकाशने आणि पत्रिकेचे काही विशेषांक त्यांना भेटीदाखल देण्यात आले. प्रा. न. म. जोशी यांनी परिषदेच्या उपक्रमांविषयी थोडक्यात माहिती सांगितल्यानंतर सर्वश्री श्री. के. क्षीरसागर, दे. द. वाडेकर, देवदत्त दाभोलकर, हेमंत इनामदार, भीमराव कुलकर्णी. मा. प. मंगुडकर, ग. वा. बेहेरे, भालचंद्र फडके, अनंतराव कुलकर्णी, आनंद यादव, म. श्री. दीक्षित, श्रीपाद जोशी, डॉ. सरोजिनी वाबर यांनी विचारलेल्या भाषाविषयक व साहित्यविषयक प्रश्नांना श्री. मोरारजीभाईंनी मराठीत अत्यंत स्पष्ट आणि खेळकर पद्धतीने उत्तरे दिली. नामदार श्री. मोहन धारिया आणि मुख्यमंत्री श्री. वसंतरावदादा पाटील हे या प्रसंगी उपस्थित होते. घाईगर्दीत ठरलेला मर्यादित वेळेतील हा कार्यक्रम आभारप्रदर्शनानंतर संपला.

**कै. माडगूळकर यांना श्रद्धांजली :** परिषदेचे अध्यक्ष आणि भूतपूर्व संमेलनाध्यक्ष श्री. ग. दि. तथा अण्णासाहेब माडगूळकर यांचे १४ डिसेंबर १९७७ रोजी सायंकाळी अकस्मात देहावसान झाले. त्यांच्या निधनामुळे अवघा महाराष्ट्र शोकाकुल झाला. त्यांच्या अंत्यदर्शनास व भव्य अंत्ययात्रेस परिषदेचे पदाधिकारी व कार्यकारी मंडळाचे सभासद उपस्थित होते. महामंडळ आणि परिषद या दोन्ही संस्थांतर्फे त्यांच्या पार्थिव देहास पुष्पहार समर्पण करण्यात आले. कै. अण्णांच्या निधनानिमित्त १५ डिसेंबरला परिषदेचे कार्यालय बंद होते. शनिवारवाड्यापुढील प्रातिनिधिक प्रकट सभेत परिषदेतर्फे कार्याध्यक्ष श्री. जोशी यांनी आदरांजली वाहिली. ३१ डिसेंबर रोजी परिषदेने एक विशेष सभा प्रा. द. मा. मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केली होती. याप्रसंगी सर्वश्री राजा मंगळवेढेकर, शंकर पाटील, भीमराव कुलकर्णी, मधुकर कुलकर्णी, शिवाजी सावंत, ग. ल. ठोकळ, ग. वा. बेहेरे, विद्याधर पुंडलिक व सौ. संजीवनी मराठे यांनी भावपूर्ण भाषणे करून आणि डॉ. दत्ता वाळवेकर यांनी गीतगायन करून कै. अण्णांना श्रद्धांजली वाहिली. नुकतेच दिवंगत झालेले कोल्हापूरचे ललित लेखक श्री. व. ह. पिटके यांनाही सभेने श्रद्धांजली वाहिली.

**संशोधनकार्य :** परिषदेच्या संशोधन समितीतर्फे डॉ. वसंत स. जोशी संपादन करीत असलेला ‘ संशोधन पद्धती ’ या विषयावरील सुमारे चारशे डेमी पृष्ठांचा ग्रंथ आता प्रकाशनाच्या वाटेवर आहे. या ग्रंथात महाराष्ट्रातील पंचवीस विद्वान संशोधकांचे लेख समाविष्ट होत आहेत. ग्रंथ जून ७८ अखेर प्रकाशित होईल. ग्रंथाची समग्र रूपरेषा पुढील अंकी प्रसिद्ध करण्यात येईल.

**वाङ्मयेतिहास योजना :** वाङ्मयेतिहास खंड २ ( इ. स. १३५० ते १६८० ) याचे संपादनकार्य डॉ. स. गं. मालशे यांनी पूर्ण करीत आणले असून सर्व लेख टंकलिखित होत आहेत. हा खंड डिसेंबर १९७८ अखेर प्रकाशित होईल. खंड १ ( प्रारंभ ते इ. स. १३५० ) याचे संपादन डॉ. हेमंत इनामदार यांच्यावर सोपविण्यात आले

असून, त्याचे लेखक आणि विषय आता निश्चित झाले आहेत. प्रस्तुत खंडाची मुद्रण-प्रत डिसेंबर १९७८ अखेर सिद्ध होईल असा विश्वास वाटतो.

**परीक्षा :** परिषदेने यंदा गुजराती, सिंधी आणि ( अ–मराठी लोकांसाठी ) मराठी वर्ग घेण्याचा नव्याने उपक्रम केला आहे. वर्गांना उपस्थिती पंचवीस–तीस होती. जानेवारी १९७८च्या पहिल्या सप्ताहात परीक्षा घेण्यात आल्या. बारा उमेदवार यशस्वी झाले. प्रा. न. म. जोशी, श्रीमती कमल जोगळेकर, श्रीमती लीला गोळे, श्रीमती वर्षा कुलकर्णी, श्री. सुहास मेहेंदळे, डॉ. दत्ता वाळवेकर व श्री. पाटील यांनी वर्गांना मार्ग-दर्शन केले.

**देणगी :** कोल्हापूर येथील परिषदेचे आजीव सभासद श्री. ग. रं. भिडे यांनी परिषदेला ज्ञानकोशकार कै. डॉ. केतकर यांचे एक तैलचित्र देणगीदाखल दिले आहे. संदर्भग्रंथालयात ते लावण्यात आले आहे. परिषद श्री. भिडे यांची आभारी आहे.

**सभासदांना विनंती :** परिषदेच्या विद्यमान कार्यकारी मंडळास मार्च १९७८ अखेर दोन वर्षे पूर्ण होतील. आणखी वर्षभराने त्रैवार्षिक निवडणुका होतील. या निवडणुकीत मतदार सभासदांची यादी पक्की करण्याच्या दृष्टीने वार्षिक वर्गणी देणाऱ्या सभासदांची वर्गणी येत्या मार्चअखेर जमा होणे आवश्यक आहे. तसेच ज्या आजीव सभासदांची अपूर्ण रक्कम जमा झालेली आहे त्यांनीही आपली उर्वरित रक्कम मार्च १९७८ अखेर भरावी, म्हणजे त्यांची नावे मतदार सभासदयादीत समाविष्ट करता येतील. सर्व सभा-सदांनी या महत्त्वाच्या गोष्टीकडे वेळीच लक्ष पुरवावे अशी विनंती आहे.

* * *

## साभार स्वीकार

९. **जोगळेकर शरद :** जादूचा पंखा; दिलीपराज प्रकाशन, पुणे, ६० न. पैसे.
१०. **पिटके. व. ह. :** मीरा चरणकर; अभिजात प्रकाशन, कोल्हापूर; रु. १५
११. **पाटील बाबा :** वाट ही चालावी; अभिजात प्रकाशन, कोल्हापूर, रु. १०
१२. **गोखले श्री. पु. :** ३३ धानमंडी; नवकमल प्रकाशन, पुणे; रु. १३.
१३. **इनामदार हे. वि. :** भक्तिपंथ : नवचिंतन; एम्. व्ही. फडके आणि कं. कोल्हापूर; रु. ८.
१४. **फडके भालचंद्र :** दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह; श्रीविद्या प्रकाशन, पुणे, रु. १८.

अनुक्रमणिका

